


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य पत्रिका.

अंक क्र. ३३१ / ऑक्टो. ते डिसें.
२००९.

या पूर्ण अंकाची झेरॉक्स प्रत
मिळावी, ही विनंती.

सहकार्याबद्दल धन्यवाद.

- डॉ. कीर्ती मुळीक.
१३/१२/२०२१.

महाराष्ट्र साहित्य पत्रिका
जानेवारी ते डिसेंबर २००९.
अंक ३२८ ते ३३१

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

□ अंक क्र. ३२८ : जानेवारी ते मार्च २००९

---

• • •






डॉ. आनंद यादव यांनी संमेलनाध्यक्षपदाचा राजीनामा देण्यापूर्वीच ह्या अंकाची छपाई पूर्ण झाली होती. याची नोंद घ्यावी; ही विनंती.
–अध्यक्ष,कार्याध्यक्ष,संपादक आणि प्रकाशक

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
दूरभाष - ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
मेघा ग्राफिक सर्व्हिसेस,
स.नं. १४/२३/४, घर नं. १५९८,
मोती बेकरीमागे. धायरी, पुणे - ४११ ०४१

मुद्रणस्थळ
जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा,
सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१

किंमत १५/- रुपये

प्रकाशन : मार्च, २००९

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**
फॉर्म नं. ४ नियम ८ अन्वये निवेदन
१) प्रकाशन स्थळ : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे-४११ ०३०.
२) प्रकाशनाचा काळ : त्रैमासिक
३) मुद्रक-प्रकाशक : डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे-४११०३०
४) संपादक : डॉ. सु. प्र. कुलकर्णी महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे-४११०३०
५) मालक : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११०३०.
मी असे जाहीर करते की, वरील तपशील माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे खरा आहे.
डॉ. माधवी वैद्य
प्रकाशक

संपादकीय

# साहित्यातील ‘खळाळ’...!

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

आनंद यादवांच्या ग्रामीणतेचा नायक भुकाकंगाल शेतमजूर आहे. त्याच्या नावावर त्याला पुरण्याइतकाही जमिनीचा तुकडा नाही. वावरावरच्या जित्रावांचा तो मालक नाही. ढेकळं फोडायची, बांध घालायचा, ऊस उकरायचा, पेकाटाचा कणान्कणा ढिला होईस्तोवर उन्हाच्या रखरखीत घाम गाळायचा. अंगावर बोजा काढून लगीन करणारा, नाहीतर तसाच जगणारा. पोराबाळाचा संसार असेल तर ऋण काढून सण साजरा करणारा. रोजगार गडी- ‘रानात श्यात न्हाई, गावात घर न्हाई’ अशा अवस्थेत जगणारा. आतडी ओढून ओढून कष्ट करावेत तरी संसाराला पैसे पुरले नाहीत; की मग भुरट्या चोऱ्या करायची पाळी काहींच्या नशिवाला ! त्यापेक्षा पोरं-वायको-संसार... ह्या सुखाकडे पाठ फिरवून, सचोटीने जगू पाहणारा. ऐपत नसतानाही सवडीत सवड काढून आषाढीची वारी करणारा... आपली माती पंढरीच्या मातीतच इठ्ठलाच्या पायी मिळावी म्हणूनच वासना धरणारा. अडाणी-भोळा-सर्वांकडून फसविला गेलेला. भोवताली सगळेकाही असून त्याचे स्वतःचे काहीच नसलेला.... न नायक ! ॲन्टी हीरो ! (Anti Hero) ! इंजेनमधला ‘सित्या’ काय आणि गोतवळ्यातील ‘नारबा’ काय... सारखेच !

यादवांनी त्याच्याच भाषेत त्याला उभा केला. कारण यादवसरांची भूमिका अगदी स्वच्छ आहे. ग्रामीण ‘भाषा’... त्यातून ‘बोली’ हीच ग्रामसंस्कृतीचे दर्शन घडविते. ते म्हणतात ‘बोट कापले’ म्हणणारा आणि ‘बॉट चिरले’ म्हणणारा... दोघांचे जीवन एकच नाही. ‘बॉट चिरते’ ते विळ्यानेच ! कापणी करताना ! ‘परंतु ‘बोट कापते’ ते फळ किंवा भाजी चिरताना ! शब्दांच्या मागे संस्कृती उभी असते. भिन्न जीवन जगणारी, भिन्न जीवन अनुभवणारी भिन्न-भिन्न माणसेच असतात. शब्दांच्या मागे कर्मसंस्कृती असते. ‘बोट’ आणि ‘बॉट’ एकच असले; तरी उच्चारणारी माणसे भिन्न जीवन जगणारी आहेत. त्यामुळे ‘बोली’ हा त्यांच्या ग्रामीण साहित्याचा अविभाज्य घटक नव्हे; अविभाज्य झरा आहे ! इथे ‘गंगोत्री’ शब्द योजला तर अप्रस्तुत होईल; वेगळ्या धार्मिक संस्कृतीकडे तो आपल्याला नेईल. अनुभूतीची लयच बिघडून जाईल. आनंद यादवांच्या ग्रामीणतेचा ‘झरा’... म्हणजे ग्रामीण बोली आणि त्यातून व्यक्त झालेले जीवनच! विहिरीतून मोट भरून डोणीत ओतलेला ‘खळाळ’! जिवंत रसरशीत ग्रामसंस्कृतीची मूळ अनुभूती. त्यामागे अपार कष्टाचा आनंद आहे. तो व्यक्त होतो. ‘खळाळ’ या नादब्रह्मातून... मोटेवरच्या गाण्याच्या उषासूक्तातून !

जीवनातील सुखदुःखे सारखीच असतात. वेगळी असते ती अनुभूती. ग्रामजीवनाची अनुभूती व्यक्त होते ती ग्रामीण बोलीतून... कारण ते कलात्मक अनुभूतीचे माध्यम आहे. खरे तर प्रत्येक अनुभूतीचा प्रथमाविष्कार बोलीतून होतो.

आनंद यादवांच्या ग्रामजीवनाचा नायक सुखाचा धनी नाही. मग तो शेतमजूर असो, गावातील एस्टीच्या ठेप्यावर चार-आठ आणे मजुरी मिळते का त्याची दिवसभर वाट पाहणारा हमाल असो, गाडीवाला असो ऐंशी ओलांडल्यावरही लावणी रंगवून फड जिंकण्याची दुबळी इच्छा जागविणारा केदारी पवार असो. की, दारिद्र्यातही दोन-चार रुपये गाठीला बांधून पंढरीची वारी करणारा वारकरी असो. शेतावरच्या चाकरीतच सुख मानणारा गडी आणि संसाराला सांभाळून कष्टाने साथ देणारी त्याची घरधनीण, शिक्षणाची नीट दिशा न मिळाल्याने सैरभैर झालेली पोरे-टोरे.... सगळे ‘नाही रे’ चेच धनी ! त्यांचा आनंद, दुःख त्यांचा हर्षामर्ष, कलह, सणसुगी, कौटुंबिक नातेसंबंध, सगळे एका केविलवाण्या मर्यादेत! सरळमार्गी जीवन त्यांच्या नशिबाला नाही. पोराच्या आजारपणासाठी स्मशानात गाडलेल्या पाटलाच्या लेकराच्या कानातील मुदी काढणारा नरसू, पळून गेलेल्या सुनेला परत घरी आणण्याचा सल्ला देणारी दिनाची आई, बैलाची जागा इंजेनानं घेतली म्हणून दुखावलेला सित्या, पंचमीच्या सणाला तरी पोरांना भात-आमटी देता यावी म्हणून

कंट्रोलातल्या तांदूळासाठी वणवण करणारी अंजना-वरातीचा शालू जपण्याचा केविलवाणा प्रयत्न करते... एक ना अनेक पात्रे 'नाही रे'... गटातीलच् ! ती जगावेगळी नाहीत; परंतु ग्रामीण वास्तवातून व्यक्त करण्यासाठी ग्रामीण बोली हेच कथेचे अंगभूत माध्यम बनते. कलात्मक अनुभूतीचे अविभाज्य अंग... स्वयंभू झरा ! झरा मूळचा खरा !

काही निवडक वाक्यांची अनुभूती घेऊया-

'नरसूच्या हुरद्याला चीर गेली', 'भिजून काला होऊन दोघंबी घरात आली', 'दोन अर्धीकच्ची वाया गेल्यावर ४-५ वर्षाच्या संसारात 'गाडगी हासली होती,' 'काळूख मिट्ट पडालाय. डोळ्यात बॉट घाटलं तरी ते दिसायचं न्हाई', 'पाऊस झीम बरसला. शेतं ओली किच्च झाली', 'डोंगरचा कडा अंगावर ढासळावा तशी रात अंगावर ढासळतीया' 'चिखळ्या उडवून अंग घाण करीत बस स्टँडवर आली. हळूहळू गाढवं- बाजूला झाली. पावसात येडबडून बसलेला कंट्रोल खोलीतन बाहेर आला. हॉटेलवाल्यानं रेडियो मोठ्यानं लावला', 'रात्रभर ढासळलेला पाऊस पुन्हा धो धो म्हणू लागला.' 'हुरदं भरून आलं... कोरड्या हिरीला एकदम् पाचपन्नास झरं लागावंत तसं झालं.'

यादवांची लेखणी ही अनुभूती नुसती वरवर टिपत नाही. आत खोल खोल जाऊन त्या संवेदना घेऊन येते आणि वाचकांच्या संवेदनांना साद घालते.

...चेचलेला मस्तवाल 'बाळा पाडा' किसना-बापूचा प्रणय पाहून डोळ्यातनं घळाघळा अश्रू काढतो. त्याचे मन यादवांच्या लेखणीलाच समजते. खाचखळग्याच्या रस्त्यावरून गाडी ओढणाऱ्या बैलांच्या मानेवर-वसिंडाला गाडीचे घसाघसा हिसकं बसून बैलांना कष्ट होतात. मळा आला की त्यांना 'वळखीची पिकं दिसत्यात' 'वाऱ्यासंग मका खुसखुसतो' आणि कोबीचं गड्डं मोठमोठ्या हिरव्याभोर पानांनी बैलांकडं बघून हासतेलं.' यादवांच्या संवेदनशील लेखणीला हे कळते.

मोटेचा 'खळाळ' गेला नि इंजेनाची 'भुत्भुत्' आली. याचे दुःखं सित्याला झाले. त्याच्या उदासीन मनाचे नैराश्य आनंद यादवांना कळते. त्याच्याच भावनेतून त्यांची कथा बोलते. 'हिरीतलं पाणी बिनढवळता इंजेन गपगार तसच वडत हुतं. पालापाचुळा हिरीतच न्हाऊन कुजत हुता. पाणी गपगार. हळूहळू मचूळ हुईत हुतं. चव बदलून कुजत चाललं हुतं. हिरीला वाटत हुतं आज ना उद्या आपलं कुजत चाललेलं पाणी ही बैलं आपल्या मोटेनं ढवळतील नि पाल्यापाचुळ्यासकट उपसा करून निवळसंख करतील.:. पर तिच्या मनात पू तसाच जमत चालला हुता... सावलीत बसून ती इंजानाचं भूत भूत भूत भूत भूत आवाज ऐकायची... मान उच्च करून आंब्याचं झाड काल बैलं कोणच्या बाजूनं गेली ते धावंवरनं बघत हुतं... ही चेतनागुणोक्ती !

ग्रामजीवनातला आणि रानातला सगळा सजीव-निर्जीव गोतावळा आपली सुखदुःखे घेऊन आनंद यादवांच्या लेखणीतून आपल्याशी बोलतो. आपल्या सुखदुःखांशी मैत्री करतो. सुख आणि दुःख ह्या संकल्पनाच मुळात कृषिसंस्कृतीतून भाषेत रूढ झाल्या आहेत. ह्या दोनही शब्दात 'ख' (म्हणजे आकाश) हा सामायिक शब्द आहे. त्यामागे 'सु' म्हणजे चांगले आकाश किंवा 'दुः' म्हणजे वाईट आकाश. आकाशाची ही रूपे सर्वांचाच जीवनाधार आहेत. परंतु ग्रामजीवन ह्या सुखदुःखांशी अधिक जवळच्या जीवनसंवेदना घेऊन जगते. 'ते जगणे' ही आनंद यादवांच्या लेखणीची व्यवच्छेदक संवेदना आहे. तोच झरा, तोच खळाळ...

हिऱ्या बैलाचा सहवास शेतगडी बाबूला जास्त. गाडी ओढताना, मोट ओढताना, नांगरट करताना... दोघंही मातीत एकरूप झालेली. पण आठनऊ सालं रानाला पाणी पाजल्यावर हिऱ्या संपला. त्याच्या हत्तीगत देहाला ढोरानं फाडून कातडी वेगळी करताना पाहिल्यावर बाबूला आपलेच शरीर चिरतायत अन् चामडं काढून आपल्यालाच वताडात फेकून दिल्यागत वाटलं. हिऱ्याच्या देहावरोबर आपल्याही देहाची मोट शिवलीय् अन् आता दोघे मोट होऊन रानाला पाणी पाजू लागले... ही अनन्वयता म्हणजेच आनंद यादव !



अनुक्रमणिका

याच पार्श्वभूमीवर जीवनाशी 'झोंबी' देत देत ते मराठीचे प्राध्यापक झाले. नांगरणी, घरभिंती आणि काचवेल यातूनच प्रकटले. त्याच लेखणीने 'नटरंग' पाहिले; आणि 'स्पर्शकमळे' अनुभवली..उण्यापुऱ्या चाळीस ग्रंथांनी मराठी 'भूमी'ला सजविले. हा 'खळाळ' आता अनेक प्रवाहांनी प्रकटत, अनेक मुखांनी साहित्यसागराला मिळाला. संमेलनाचे अध्यक्षपद मिळणे हा एक उपचार राहिला होता. तोही मिळाला. हे चांगले झाले. नसते मिळाले; तरी ह्या खळाळाचा चिरस्थायी अविस्मरणीय आनंद थोडाच कमी होणारा आहे ?

## 'नवा वाणी मुखे मुखे ।'

*पिण्डे पिण्डे मतिर्भिन्नः । कुण्डे कुण्डे नवं पयः ।*
*जातौ जातौ नवाचारः । नवा वाणी मुखे मुखे ॥*

सुभाषितकाराचे हे वचन किती सार्थ आहे; याचा प्रत्यय बोलीच्या अभ्यासक्षेत्रात पदोपदी येतो. प्रत्येक बोलीच्या मागे बुद्धीचे भिन्न आविष्कार, जातीजमातीचे नवनवीन आचारधर्म, प्रत्येक भूप्रदेशाचे नवे पाणी आणि परा-पश्यंति-मध्यमा या मार्गाने प्रवास करीत मुखर झालेली वाणी - वैखरी-नवनवोन्मेषशालिनी आहे. आपला जीवनधर्म घेऊनच ती प्रकटते. तो प्रथमाविष्कार 'बोली'चाच ! बोलीच्या अभ्यासकांनी हा जीवनसंस्कृतीचा खजिना उघडायला सुरुवात केली आहे. डॉ. हरिश्चंद्र बोरकर, डॉ. पुष्पा गावित, डॉ. माहेश्वरी गावित, डॉ. सी. सी. राठवा, डॉ. सुभाष पावरा इत्यादी अभ्यासकांची नव्या दमाची फळी पुढे सरसावली आहे. बोलीतील गीते, लोककथा, लुप्तप्राय होत चाललेले-लोकाविष्कार, आधुनिकतेलाही लाजवील अशा प्रगत लोकरीती, अनोखे लोकनाट्याचे प्रकार, सणासुदीच्या आनंदात भर टाकणारी मौखिक परंपरेने जतन केलेली लोकगीते- शाहिरी गीते- त्यांच्या अभ्यासातून सहस्रमुखांनी प्रकट होऊ लागली आहेत. ती अंतर्मुख करायला लावणारी आहेत.

या अंकात डांगाणी, भिलोरी, पारूषी, गोलेवार, वऱ्हाडी, अहिराणी, माणदेशी, मराठवाडी या बोलींविषयी अभ्यासपूर्ण लेख आहेत. काही अभ्यासकांचे उदा. डॉ. हरिश्चंद्र बोरकर यांचे 'झाडी' बोलीवरील, डॉ. भगवान ठाकूर यांचे अहिराणी वरील, आणि प्रा. बाळासाहेब बळे यांचा 'पारधी' बोलीवरील असे अभ्यासपूर्वक लिहिलेले लेख वेळेत न आल्याने समाविष्ट करता आले नाहीत. बोलीचा केवळ भाषिक अंगाने नव्हे; तर सर्वांगाने अभ्यास होणे गरजेचे आहे; इतका सामाजिक, सांस्कृतिक आणि साहित्यिक खजिना बोली भाषेत आहे. नव्या-भाषा अभ्यासकांचा परिचय करून घेणे आवश्यक आहे. हे खूप मोठे काम आहे. या अंकाच्या निमित्ताने त्या 'नवा वाणी'चा शोध घेण्यास प्रारंभ तर केला आहे.

पाचोरा येथील विभागीय साहित्य संमेलनात 'बोली'वर परिसंवाद आयोजित केला होता. त्या निमित्ताने जी उद्‌बोधक भाषणे झाली; त्यांनाच लेखस्वरुपात या अंकात स्थान दिले आहे. याशिवाय अन्य अभ्यासकांचे लेखही समाविष्ट केले आहेत. 'बोली' ही प्रमाणभाषेची एक शाखा म्हणून तिच्याकडे पाहिले गेले. परंतु प्रमाणभाषेपासून दूर आणि तुटलेली 'बोली' जीवनाचे स्वतंत्र रसरशीत रूप घेऊन आपापल्या जागी वाढली, तिचा जीवनाविष्कार थक्क करायला लावतो. बोलीला स्वतंत्र साहित्यसंसार आहे. तो उपेक्षित खजिना प्रकाशात आणणारे अनेक अभ्यासक निरलसपणे काम करीत आहेत. त्यांच्या कार्याचा परिचय व्हावा म्हणून उपलब्ध झालेल्या मोजक्याच साहित्यिकांचे 'बोली' वरील अभ्यास लेख केवळ तोंडओळख करून देतील. अनेक अभ्यासकांच्या कार्याचा महासागर आता प्रकट होऊ लागला आहे. पत्रिकेच्या ह्या अंकात मर्यादित स्वरुपात प्रकट झालेला बोलीचा अभ्यास प्रेरक आहे. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या त्यांना शुभेच्छा !

-सु.कुलकर्णी

(संपादक)
दि. ८ मार्च २००९
७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग, अहमदनगर.
E-mail : suprakulkarni@gmail.com



अनुक्रमणिका

# सह्यशिखरांच्या कुशीतील 'डांगणी बोली'

प्राचार्य डॉ. अनिल सहस्रबुद्धे

सह्याद्रीचे सर्वोच्च शिखर कळसुबाई, अळंग, कळंग, मदानगड, अजुबा, रत्नगड, पट्टागड, हरिश्चंद्रगड अशा सह्याद्रीपर्वत शिखरांच्या उतरणीवरच्या गावांना 'डांगाण' असे नाव आहे. 'डांगण' या शब्दाचा अर्थही डोंगरउतरण, झाडाची फांदी असाच आहे. या दोन्ही अर्थांनी सह्यशिखरांच्या डोंगरउतरणीच्या परिसराला 'डांगाण' हे नाव यथायोग्यच आहे. सह्यशिखरांच्या या भागातील रांगांना 'हरिश्चंद्र रेंज' असेही नाव आहे. गोदावरीच्या प्रमुख उपनद्या अमृतवाहिनी प्रवरा, मुळा, अढळा, कृष्णवंती, म्हाळुंगी आणि छोट्या छोट्या अनेक नद्यांच्या उगमांचा हा प्रदेश. कधीकाळी 'चाळीसगाव डांगाण' म्हणून ओळखला जाई. घनदाट अरण्याचा हा प्रदेश. सर्व जलप्रणालींना एकत्रित करीत प्रवरा आणि मुळा अशा दोन मोठ्या नद्या निर्माण होऊन पुढे प्रवरासंगम येथे गोदावरीला मिळतात आणि गोदावरी म्हणून वाहू लागतात. निबिड दंडकारण्याचा हा भाग. पुणे, ठाणे, नाशिक आणि अहमदनगर जिल्ह्यांच्या सीमेवरचा परंतु अहमदनगर जिल्ह्यातील अकोले तालुक्यातल्या पश्चिम घाटाचा हा प्रदेश. भंडारदरा डॅम (विल्सन डॅम) मुळे महाराष्ट्रातील आणि भारतातील त्याच बरोबर पाश्चात्यांच्याही परिचयाचा हा प्रदेश, गुजरात लमधील 'डांग' जिल्ह्याचा याशी काही संबंध नाही. मुंबईला अगदी जवळ 'डॅम'च्या पर्यटनस्थळामुळे गजबजलेला. सांस्कृतिकदृष्ट्या समृद्ध तसाच ऐतिहासिकदृष्ट्या होळकरांच्या त्र्यंबकप्रांतातला आणि स्वातंत्र्यचळवळी दरम्यान भुमिगतांना सांभाळणारा हा प्रदेश. या प्रदेशात प्रामुख्याने आदिवासी महादेव कोळी यांची आजच्या तहशीला प्रमाणे सलग १२५ गावे येतात. महादेव कोळ्यांबरोबर, स्वतंत्र वाड्या करून असलेले आदिवासी ठाकर आहेत. 'क' ठाकर आणि 'म' ठाकर या दोन स्वतंत्र ठाकर जमात गटांपैकी या परिसरात 'म' ठाकर आहेत. या दोन प्रमुख आदिवासी जमातींबरोबर कधीकाळी स्थलांतरित होत आलेले व स्वतःला कानडी म्हणविणारे तलवार कानडे गावोगावी आपले स्वतंत्र स्थान पटकावून आहेत. याशिवाय हेटकर कानडे अशी एक दाक्षिणात्य बोली बोलणारे अत्यल्पसंख्य लोक आहेत. या परिसराच्या पठारांना जोडून असलेल्या भागात मराठा, कुणबी आणि अठरा पगड जातीचे लोक राहतात. अर्थातच 'डांगाणी बोली' असा सामान्यपणे ज्या बोलीचा उल्लेख करता येतो; ती लोकसंख्येने बहूल आणि प्रमुख असलेल्या महादेव कोळी जमातीची डांगाण परिसरातील भाषा म्हणता येते. अन्य जमातींचे वैशिष्ट्यपूर्ण वेगळेपण लक्षणीय असले; तरी त्या जमातींची बोली प्रमुख प्रवाहात मिळून गेली आहे म्हणूनच 'डांगाणी बोली' या नावाने; उपरोक्त सह्यशिखरांच्या कुशीतील डांगाण परिसराची 'बोली' म्हणून येथील बोलीचा विचार अपरिहार्य आहे. ही बोली निर्विवादपणे 'मराठी'भाषेची एक प्रादेशिक बोली म्हणून म्हणता येते.

**१) बोली परिचयाचे स्वरूप :**

भाषेच्या अभ्यासाच्या अनेक पद्धती आहेत. ऐतिहासिक भाषा विज्ञान आणि वर्णनात्मक भाषाविज्ञान हे त्यातील प्रमुख मार्ग. सामाजिक भाषाविज्ञानाची परंपरा अलिकडील काळात निर्माण झालेली आहे. तौलनिक भाषाविज्ञान पद्धतीनेही भाषेचा अभ्यास करता येतो. येथे 'डांगाणी बोली' चा यथायोग्य परिचय करून देण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

भाषा जिवंत माणसांच्या विचार आणि भावनांची देवाणघेवाण करण्याचे साधन आहे. माणसांच्या परंपरेबरोबरच ती परंपरागत होते. यात शब्दसंकेत चालत येत असताना त्यांच्यात निरनिराळ्या कारणाने स्वरूपगत बदल घडतात. हे 'मराठी लोकांची संस्कृती'चे वर्णन करताना इरावती कर्वे यांनी व्यक्त केलेले मत भाषाभ्यास करताना लक्षात ठेवावे लागते. त्याचबरोबर 'लोकसाहित्याची भाषा' स्वरुप स्पष्ट करताना डॉ. सरोजिनी बाबर यांनी 'लोकसाहित्य साजशिणगार' मध्ये व्यक्त केलेले भाषेचे वैशिष्ठही विचारात घ्यावेच लागते.'' भाषा स्वच्छंदी आहे. तिला बंधन कोणी घालू शकत नाही. भाषेवर बंधन नसल्यामुळे ती जिवंत झऱ्याप्रमाणे प्रवाहिनी बनते; आणि योग्य वाटेल त्या तऱ्हेने आपले जीवितकार्य पार पाडीत असते.'' त्यामुळे

भाषेचा अभ्यास करताना आणि परिचय घडविताना स्थल, काल आणि परिस्थिती विषयी प्रश्न निर्माण होणे अपरिहार्य असते. हे सगळे गृहित धरून येथे 'डांगाणी बोली'चा परिचय करून देताना सामान्यतः 'चाळीगाव डांगाण परिसर : सांस्कृतिक, वाङ्मयीन (लोकसाहित्य) आणि भाषिक अभ्यास' या विषयावरील प्रबंधाची तयारी किंवा अभ्यास करताना केलेल्या सर्वेक्षणातून मिळालेल्या भाषिक नमुन्याच्या आधारे आणि त्या भाषेच्या सहवासातून आत्मसात झालेल्या भाषेचे ललित साहित्यात प्रकटलेले रुप नमुन्यांच्या आधारे वर्णनात्मक पद्धतीने अर्थात् व्याकरण आणि वाक्प्रचार, म्हणी, शब्दप्रयोग यांची वैशिष्ट्ये ठळकपणे मांडून परिचय करून देण्याचा येथे प्रयत्न आहे.

**२) डांगाणी बोलीचे नमुने**

**अ) क्षेत्रीय अभ्यासातील संग्रहित लोककथा-**

१) यक पोऱ्या व्हता. त्यो औताली ग्येलता. त्येच्या नांगराला धनाचा हांडा लागला. त पैसें काहीतरी कान्याकोच्या पडलं असं. त्यो हंड्यात भरीत व्हता. त्येती माय आली. म्हन, "काय रं बा करतोय ?" त मनांत म्हनं, "मह्या आईना धनाचा हांडा पह्यला." म्हून मायला टाकला मारून. आन लागला पुराया. तवा भाऊ आन माय येईना म्हून त्येचा भाऊ धीऱ्या धीऱ्या त्येंठ आला, त मंग पोऱ्या मनात म्हनं, "भावानयवी पह्यला जनु" मंग त्याना भावय मारला. फक्ती आता हांडा आन त्योच ऱ्हायला. रात झालेवर हांडा उचालला आन गावात नियाला लागला. गावात शितानाच, चार चोर आलं हुतं त्ये भेटलं. त्येंली गावात कायच मिळाला नव्हता. आन त्ये परतून येरीच चाललं व्हतं. त चोर म्हनं, "तू कोन ?" आम्हाली पानी पीयचा हांडा उतार खाली." त मंग हांडा उतारला खाली. चोरांनी पाह्यला हांड्यात सोनाच नद्र पडला. त मंग, त्येलाय टाकला मारून. मंग त्येनी चौघानी इचार क्येला का, "ह्या पैशाली पाहून काय करता ? खाता निस्ते पैस्याली ?" गावांत यक हलवायाचा दुकान व्हता. त म्हन का कायतरी आनून, खावा. दोघं ऱ्हायलं हांड्यापाशी आन दोघं आलं हालवायाच्या तीठं. त्येनी घेतलं लाडू. त्येंली खायला चांगलं लाडू घ्येतलं आन हांड्यापसले दोघाली घ्येतलं इखाचं लाडू. आन त्येंली वाटला देऊ त्येंली खायला. मंग हांड्यापासल्या चोरांली वाटला का त्यें लाडू धिऊन आलं का त्येंली पानी आनाया लावू आन दिऊ इहिरीत लोटून. मंग त्येंनी तसाच क्येला. त मंग त्ये गलं मरून. आन इकडं आल्यावं त्येंनी इखाचं लाडू गपागपा खालं त त्येवी गेलं मरून आन धनाचा हांडा तसानतसाच रयला. ('दैवानं दिलां आन कर्मानां नेला' ही कथा पीएच.डी. साठीच्या टंकलिखित प्रबंधातून प्रातिनिधिक स्वरुपात दिली आहे. कथा संकीर्ण क्र. ६ अभ्यासासाठी एकूण ५७ लोककथा- 'चाळीसगाव डांगाण परिसर : सांस्कृतिक वाङ्मयीन आणि भाषिक अभ्यास' प्रबंधाच्या परिशिष्ट क्र. २ मध्ये प्रातिनिधिक नमुने म्हणून संग्रहित केल्या आहेत. पुणे विद्यापीठ- मराठी-१९७९-८०)

**ब) क्षेत्रीय अभ्यासातील संग्रहित लोकगीते-**

**१) अभंड गंगुबाई**

विणा खांडीमंदी विणा वाजता सवयी ।
तीरमक राजाचा नीळ परभात जावाई ॥
निंगाली गंगुबाई झाड उंबराच्या खोडी ।
परगंधा झाली कुशावर्ता थोडी थोडी ॥
निंगाली गंगुवाई जाग जाग कपारीली ।
तिरमक राजाना अंघुळीला व करली ॥
निंगाली गंगुबाई दुधातुपाच्या उकळ्या ।
तीरमक राजाना जटा सोडल्या मोकळ्या ॥
तीरकम राया जटा आपटी रागा रागा ।
अभंड गंगुबाई ग्येली गोसायाच्या मागा ॥
तीरमक राया जटा आपटी ठायी ठायी ।
अभंड गंगुबाई येला आकळली नही ॥
(जात्यावरच्या ओव्या- गीत क्र. ७)

**२) फुगडी फू**

सांदीकोंदीना पडल्यात गहू
त्याच्या चपात्या केल्यात नवू
यक चपाती काय ग केली
मह्या भावाला निऊन दिली
तुझ्या भावाना काय ग दिली
मह्या भावाना भिंगरी दिली
भिंगरीची तार तुटं
मह्या फुगडीचा दन का उठं
(नवरात्रातील गाणी- खेळगीत क्र. २)

३) डवणा
दऱ्यानं दिली ह्याच रं
आन उटी बा बसविली
तीच्या का उटीला
आन डवणा पेरीला
असा तो ही का डवणा
वाढीला रोढीला
असा तो ही का डवणा
फुलायां लागलं
ते डवण्याच्या फुलं
बहिरीच्या पूजाला
रंगाण रंगाणऽऽ हे
मातीचं रंगाणऽऽ हे
(ठाकरांच्या कोंबड नाचातलं एक गीत, गीत क्र. १२)

४) देव वाघराजा
देव वाघराज नवसाला पावत ।
शंबर शेरडा त्येच्या नवसाला लागत ॥
देव वाघराज पयली पायली नेमाची ।
यंगून देईना डोंगर गर्विया मनाली ॥
देवू वाघराज आमच्या येशीत नकू येऊ
आमची गुरांढोरां नको वायाला जाऊ देऊ ॥
(दैवतांची गाणी, गीत क्र. ११)

५) बाईला मांगना
बाईला मांगना गल्या गल्यनी झालं थवं ।
गवळण माझी ढगामंदी ईज लवं ॥
बाईला मांगना आलं जव्हारीचं राजं ।
बाप म्हन लेकी अवल सोना माझं ॥
बाईला मांगना आलं राजूरा वरुनी ।
गवळण माझी लेक मोठीशी म्हणूनी ॥
बाईला मांगना सैन बसली उन्हात ॥
बंधवाच्या माझ्या कसं येईना ध्येनात ॥
बाईला मांगना सोयिरीला सांगा नका येऊ ।
गवळण माझी मोठी व्हईल मंग देऊ ॥
बाईला मांगना सोयीटेली सांगा नकु येरझरा ।
गवळण माझी लक्ष्मबाई नवरी गेली मामघरा ॥
(लग्न, पाचवी, बारसे इ. संस्कार/विधी गीते, गीत क्र. ३)

६) देते तांदळाला घावू
राम म्हणू म्हणू राम माझे गुरू भाऊ ।
सोन्याची सळई देते तांदळाला घावू ॥
चालणं चंचल तुझं बोलणं मंजुळ ।
मुखातील दात जिऱ्यासाळीचं तांदूळ ॥
तांदळाला घावू (कशी) देती दणा दणा ।
तांदूळ तांदूळ कसा निंघतो दाणा दाणा ॥
तांदूळाचा दाणा कसा निघतो राशी राशी ।
तांदळाला घावू देती किती बाया घशी घशी ॥
(भलरी गीते/श्रमगीते, गीत क्र. १)

उपरोक्त सर्व लोकगीते 'चाळीसगाव डांगाण....' या प्रबंधातील परिशिष्टातून प्रातिनिधिक स्वरुपात येथे दिली आहेत. लेखकाच्या संग्रही एकूण १५५ लोकगीते प्रातिनिधिक स्वरुपात आहेत.)

**क) क्षेत्रीय अभ्यासाधारे संग्रहित वाक्प्रचार-**

मेटा देणे- लाथा मारणे, झुरुक मारणे- चमक मारणे, उठून दिसणे, माग लागणे- सुगावा लागणे, काट्या घालणे- काटे पसरणे, पाजाया लागणे- दूध काढणे, कडका लागणे- सुगावा लागणे, मुरसड येणे- चक्कर येणे, दणका उठणे- जोरात सुरू होणे, शीनसे बोलणे- टोचून बोलणे, पूस घेणे- सल्ला घेणे, राळ होणे- नाश होणे, शिऱ्याची चोळी- नखरेबाज चोळी (चाळीसगांव डांगाण.... संग्रहात नमुन्यादाखल १५० वाक्प्रचार नोंदविले आहेत त्यातून येथे १२ वाक्प्रचार प्रातिनिधिक स्वरुपात घेतले आहेत.)

**ड) म्हणी- क्षेत्रीय अभ्यासाधारे संग्रहित-**

१) मी नही खात, आन महा जीव त्यात- (ढोंगीपणाचे/दांभिकपणाचे वागणे.)
२) येडी हळद, आन लवणाचा नाश- (नसती उठाठेव.)
३) आळ्याचा ना मोळ्याचा, पंढरपूरच्या पोळ्याचा- (निरूपयोगी)
४) इरीवर निवाला, आन चुलीवर देव्हारा- (नको त्या जागी नको त्या गोष्टी.)
५) आमला आमला आन चट झोंबला- (निरूपायाने करावेच लागणे.)

(चाळीसगाव डांगाण- संग्रहातील प्रातिनिधिक संग्रहित म्हणींमधून येथे नमुन्या दाखल पाच म्हणी दिल्या आहेत.)

ई) 'डांगाणी' या डांगाणी बोलीभाषेत लिहिलेल्या कादंबरीतील उतारा- ('डांगाणी'- ले. अनिल सहस्रबुद्धे/परिमल प्रकाशन, औरंगाबाद, १९८५)

१) 'पाच पावलं जातो तोच दुसऱ्या बाजूच्या गुरुवाटानं लक्षा ठाकर, त्याची बायकु लखी, पोऱ्या सक्रु वर येंगताना दिसले. हायस वाटलं. आता एकाला चौघ अन् दोन हेल्गे अशी सारीच कामाला लागणार होती. भागानं आरोळी दिली "लक्षा होऽऽ, आला रं" मग लक्षाची पावूलही झप झप उचलली. लखीच्या डोक्यावर पाटी होती. कमराला इळा होता. उभारवट्याच्या चापून नेसल्या पातळावर अंग झाकायला फडकी होती. अन् धोतराच्या झोळीत लक्षाची पोर लखीच्या पाठंगुळी होती. केस पिसाटासारखे पिंजारलेला, लंगोटी लावून वर कुडता आडकवलेला सक्र्या दोघांच्या मागं पळत होता. सगळी येताना पाहून भाग्या हारखला. आपण येवोस्तर सुद्धा भाग्याला धीर धरवणार नाही हे लक्षाला माहीत होतं. "काहरं दादा, लय घाईव आलय काय ?" लक्षानं विचारलं. त्याची खोच लक्षात येऊन भाग्याने समजावण्याचा प्रयत्न केला, "तसा नाही रं पर", "हा हा कूकं ग्येलात कसा काय ? अरं दादा तुझ्या भनीना जाऊन दिलां असता रं कुठ ?" लक्षानं प्रेमानं टोकलं. "तसा नही रं पर..." भाग्यानं पुन्हा बोलण्याचा प्रयत्न केला. "हा हा रहुंदी रहुंदी", लक्षानं भाग्याचं बोलणं तोडलं. लखीला हासु आलं. ती मग धोंडा मांडल्या झाडाकडं निघाली. "सक्र्या, तिठ्ठ झाडाकं तुझ्या आईसंग हुई. बाभळीला झोळी टांग", लक्ष्यानं सूचना दिल्या. मग लखी सक्र्या बाभळीकडे गेले. झाडाला झोळी टांगली. लक्षाची पोर झोळीत निवांत झोपली. धोंड्याच्या त्या बाजूला सक्र्यानं टोपला ठेवला तोच "अरा रा राऽऽ सक्र्या होऽऽ आरं चाल" लक्षाची आरूळी आली. मग लखी, सक्र्या धोंडे वेचू लागले. मधुनच विळ्यानं, मधेच उगवलेलं एकार्ध झुडुप तोडायला सुरुवात केली. लक्षा आन् भाग्या हेल्ग्यांना हाळून नांगर ओढू लागले. थांबायला सवड नव्हती. अन् धीर ही नव्हता. लगबग, धावाधाव, ठोक, ठोक, खाट, खोट, धडाड ठोक, 'ह्यमन्या' 'म्हशा' होऽ होऽ हो अशा आवाजांनी कधी नव्हे तो माळ दुमदुमला लक्षानं भसाड्या आवाजात हेल्ग्यांना साद घातली, 'माळा मंदी रंऽऽ ! तांवड्या माळा मंदी रंऽ ! आवत हाकाया घइं रंऽ पर आवताली वैलंच नही रं ! आवताली वैलच नहीं रंऽ हेल्ग्या हो ऽऽ !' (डांगाणी पृ. १६, १७)

२) "पिऱ्या मी येऊ रातचा सस्याली ?" राधीनं धिटाईनं विचारलं. अन् पिऱ्या टारच झाला.

"यियाचा त ये, मी कह्याला नही म्हनू रं ?" पिऱ्या जरा बेफिकिरिनंच म्हणाला.

"पय बरां, मी खराच यीन आन सस्याला सोडून तू महाच कालवाण करशीन !" राधी अशी हल्ली अन् काठी आपटीत पळून गेली. पिऱ्या पहातच राहिला. न.ळाटीची कालवड गोऱ्हा पाहून उधळावी तशी राधी वाटली. (डांगाणी, पृ. ६१)

३) "मी कह्याला तिला पळवून निऊ. तीच मह्या संग येणार हायें." पिऱ्याने मुद्द्याला बगल देऊन उत्तर दिलं. "अर पर मंजी तूच तिला साथ देनार नव्ह ?" यसुवानं विचारलं तस ग्वाळा रोंगट्याला वर वाटलं. हा मुद्दा त्याच्या बाजूचा होता. पण पिऱ्यानं न थांवताच उत्तर दिलं, "साथ दियाचा काम परश्न नही ती तं मही बायकु हाये. ती मह्या संग नही इल त कसी रं ?" "तुही बायकु? कवा लगीन झाला रं ? गावाच्या इरहीत आन तीचा बा जीता असताना ?" बाळा रोंगटा उसळून म्हणाला. तशी गावकीची मंडळी जरा सावरून बसली. मंगळा ठाकर म्हणाला, "ह्या पंय बाळ्या ह्या तं पोरां आह्यात, त्येंचा नीट ऐकून घी मंग पहू" मग त्येना पिऱ्याला विचारलं "कूकं झाला रं तुहा लगन ?" "वाग्रेश्वराच्या तीठ आम्ह्या माळा घातल्या व्हत्या." पिऱ्यानं सांगितलं. "असा ? कोन कोन रं व्हंता संग तुझ्या ?" लक्षाच्या बा न विचारलं "कोन नव्हता पर ह्या खरां आह्ये." पिऱ्यानं छातीवर हात ठिवून सांगीतलं. तशी येसुवानं मुद्द्याची गोष्ट काढली," मंजी तुमचा लगन कोणीच पाह्यला नही मंजीच त्वा फूस लावली खरा."

(डांगाणी, पृ. ११५) - डॉ. अनिल सहस्रबुद्धे यांच्या 'डांगाणी' आणि अहिनकुल (ऐतिहासिक कादंबरी) अशा दोन कांदवऱ्या सोडल्यातर काही कविता व स्फुट लेखन असेच साहित्य उपलब्ध आहे. लोकसाहित्याचा अभ्यास झाला आहे.

(फ) मराठी भाषेची पोटभाषा म्हणून 'डांगाणी बोली'चा विचार करताना निवडक वाक्यांच्या आधारे

तुलनात्मक पाहाणी करण्याचा प्रयत्न केला आहे. येथे महादेव कोळी, ठाकर यांच्या बोलींचे नमुने दिले आहेत. तलवार कानडे महादेव कोळ्यांप्रमाणे बोलतात मात्र मध्यवर्ती मराठी प्रमाणे बोलण्याचा प्रयत्न अधिक असतो. म्हणून त्यांची स्वतंत्र मांडणी केली नाही.

३) डांगाणी बोलीचा व्याकरण विचार : मुद्दा क्र. २ मधील 'अ' ते 'फ' बोलीचे नमुने पाहिले तर त्या वरून बोलीची तोंडओळख सहज होते.

व्याकरणदृष्ट्या विचार करता पुढील प्रमाणे वैशिष्ट्ये आढळतात.

**i) नाम, सर्वनाम, विशेषण विचार :**

अ) लिंगभेदानुसार नामांची वचन व विभक्तीनुसार रूपे पाहता येतात-

१) अकारान्त पुल्लींगी नामे अनेक वचनी होताना आकारान्त होतात.

२) काही अपवादात्मक नामे रूप बदलत नाहीत. जसे राग- राग इ.

३) विशेष नामांचे अनेक वचन करण्याची पद्धत नाही.

४) अनेकवचन रुपांवर अनुस्वार दिला आहे कारण उच्चार करताना तसा होतो. उदा. लेक-लेकां इ.

**ब) अकारान्त स्त्रीलिंगी नामांच्या बाबतीत-**

१) अनेकवचनी रूप आकारान्त होते जसे पपय - पपया इ.

२) आकारान्त होताना विकल्प आढळता जसे मोदळ - मोदळा/भोदळी इ.

३) काही नामे रुपे बदलत नाहीत जसे निर्गुडी- निर्गुडी (अपवाद)

**क) अकारान्त नपुंसकलिंगी नामांच्या बाबतीत-**

१) अनेकवचनी रुपांत अनुच्चारित अनुस्वार येताना दिसतो. जसे दूध - दूध

२) काही नामे आकारान्त होतात जसे अंगण - आंगणां

३) काही नामे इकारान्त होतात जसे अंड - अंडी

**ड) आकारान्त पुल्लींगी नामे पुढील प्रमाणे आढळतात-**

१) अनेक वचन होताना अकारान्त होऊन त्यावर अनुच्चारित अनुस्वार येतो जसे राजा- राजं, विववा - विववं इ.

२) रूपे बदलत नाहीत जसे कन्हेरा- कन्हेरा, आपटा- आपटा.

**इ) आकारान्त स्त्रीलिंगी नामे पुढील प्रमाणे आढळतात-**

१) रूपे बदलत नाहीत जसे बया- बया, हारका - हारका.

२) विशेष नामांची अनेकवचने होत नाहीत.

| क्र. | मध्यवर्ती मराठी | महादेवकोळी बोली | ठाकर बोली |
|---|---|---|---|
| १. | हे कुत्रे आहे. | ह्या कुत्रा आहे | ह्या कुत्रा आहे. |
| २. | ही दोन घरे आहेत. | ह्या दोन घरं आह्यात. | ह्या दोन घरां आह्यात. |
| ३. | माझा मुलगा घरात आहे. | महा/मवा पोऱ्या घरात आहे. | माजवाला पोऱ्या घरात आहे. |
| ४. | तुझा मुलगा शाळेत गेला. | तुहा पोऱ्या साळात ग्येला. | तुजवाला पोऱ्या साळात ग्येला. |
| ५. | पान घेऊन तो येथे आला. | पान घेऊन तो इठ आला. | पान घेऊन तो यठ आला. |
| ६. | फुलांना सुगंध नाही. | फुलांली वास नही. | फुलांली वास नाय. |
| ७. | लहान मूल रांगते. | बारीक पोर रिंगताय. | बारीक पोर रिंगताय. |
| ८. | आमच्या भागात ठाकर आहेत. | आमच्या भागात ठाकरं आह्यात. | आमच्या भागामंदी ठाकूर आहेती. |
| ९. | भात लावणे चालू आहे. | भात आवण्या चालू आहे. | भातां आवण्या चालु आहे. |
| १०. | त्याचे घर माझ्या घरापेक्षा मोठे आहे. | त्याचा घर मह्याघरापासून मोठा आहे. | त्याच्यावाला घर मह्या घरा पासून मठां आहे. |

(अशा ३५० वाक्यांची मांडणी संग्रहात आहे.)

३) अपवादात्मक ईकारान्त झालेले दिसते जसे ढोला- ढोली.

**फ) आकारान्त नपुंसक लिंगी नामे पुढील प्रमाणे आढळतात-**

१) चाणा, चित्रा, शिका ही नामे नपुंसक लिंगी आहेत तथापि ती मनाप्रमाणे स्त्रीलिंगी व पुल्लींगी स्वरुपातही बोलीत येतात.

२) ही नामे बहुधा पुल्लींगी स्वरुपात आढळतात.

**ग) इकारान्त स्त्रीलिंगी नामे पुढील प्रमाणे आढळतात-**

१) बहुतेक नामे आकारान्त होतात जसे पोळी- पोळ्या, मोळी- मोळ्यां, दिवाळी- दिवाळ्या.

२) ई चा या होतो वरमाई - वरमाया.

**म) इकारान्त पुल्लींगी नामे पुढील प्रमाणे आढळतात.**

१) इकारान्त पुल्लींगी अत्यल्प आहेत.

२) रूपे बदलत नाहीत जसे दाजी - दाजी, शेतकरी- शेतकरी.

**भ)** इकारान्त नपुंसकलिंगी नामे आढळत नाहीत तरी अपवादाने पानी- पानी असे आढळते. मात्र पाऊस या अर्थी पानी हा शब्द वापरताना तो पुल्लिंगी असतो.

**न) उकारान्त पुल्लिंगी नामे पुढील प्रमाणे आढळतात-**

१) रूपे बदलत नाहीत जसे लाडू - लाडू

२) अनेकवचनी रुपांवर अनुच्चारित अनुस्वार येतो.

**य) उकारान्त स्त्रीलिंगी नामे-**

१) अनेकवचन होताना आकारान्त होतात जसे आऊ- आवा.

२) 'अब्रू' सारखे अपवादात्मकतेने रूप बदलत नाही.

**र)** उकारान्त नपुंसकलिंगी अनेक वचनी होताना आकारान्त होतात. संख्या अत्यल्प आहे. उदा. पिलू - पिलां.

या सर्व वैशिष्ट्यांवरून एक महत्त्वाचा निष्कर्ष पुढे येतो तो म्हणजे लिंगवचन व्यवस्था मनःपूत आहे. मराठीचे हे वैशिष्ठ्य येथेही पाहावयास मिळते.

ल) सर्वनामांची रूपे पुढील प्रमाणे आढळतात-

प्रथमपुरुष - एकवचन- मी , म्या, आपुन.

अनेकवचन- आमी, आम्ह्या, आपुन/आपुनी

द्वितीयपुरुष - एकवचन- तू त्वा, अनेकवचन- तुमी, तुमी/तुम्ही

तृतीय पुरुष - एकवचन- तो, त्या ते, ती, हा, ह्या, ह्यो, ही, अी, हे

अनेकवचन- त्या, ते, त्ये, ह्या, या.

नामविभक्ती प्रत्ययांनुसार ही सर्वनामे रुप बदलतात. उदा. द्वितीया- एकवचन- ला, अनेकवचन - ली, या नुसार - मला, आपनाला, आमाली, आम्हाली इ. ही रुपे पुरुषांप्रमाणे बदलतात जसे तुला, तुमाली, त्येला, त्यांली इ.

व) दर्शक सर्वनामे पुढील प्रमाणे आढळतात- १) 'ह' आणि 'इ' पासून तयार झालेली दर्शक सर्वनामे जवळचा निर्देश करतात तर 'त' पासून तयार झालेली सर्वनामे लांवचा निर्देश करतात. जसे हा, इठ, त्यो, त्या, तीठ इ.

श) मराठी प्रमाणे जो, जी, ज्ये, जी, ज्या अशी संबंधी सर्वनामे आढळतात.

स) प्रश्नार्थक सर्वनामे 'क' पासून तयार होतात. लिंग वचन विभक्ती नुसार रुपे बदलतात. सामान्यतः ही सर्वनामे पुढील प्रमाणे आढळतात. कोन, कोनी, कसा, कंचा इ.

**ह) नामविभक्ती प्रत्यय**

| विभक्ती | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा- | उ | .... |
| द्वितीया | ला, ली, यी/इ. | ला, ली, यी |
| तृतीया | ना, नी, नं, शी | ना, नी, नं, शी. |
| चतुर्थी | ला, ली, यी/इ | ला, ली,यी/इ |
| पंचमी | कून, पून, पासून | पुन, पासून |
| षष्ठी | चा, ची, चं, | चा, ची, चं, |
| | वाला, वाली, वालं | वाला/ली/लं |
| सप्तमी | प, क, पशी, कड, मंदी | प, क, पशी, कड |
| संबोधन | नु | नु |

प्रत्यय लागताना मराठी प्रमाणे 'सामान्यरूपे' होण्याची वृत्ती आहे.

ळ) विशेपणे, नामसाधित, धातुसाधित, सार्वनामिक, दर्शक संख्या अशा सर्व प्रकारची आढळतात. (चाळीसगांव डांगाण... या प्रवंधात त्यांची मांडणी उदाहरणांसह केली आहे.

**¡¡) आख्यात विचार- काळ, धातू, इ.**

**अ) धातू विचार :** अकर्मक आणि सकर्मक अशा दोन्ही स्वरुपात हा विचार करता येतो. मात्र येथे बहुतांशी सकर्मक म्हणूनच विचार करावा लागतो. प्रयोगावर आधारित विचार करताना हे वैशिष्ट्य आढळते.

**आ) क्रियापदे :** मराठी प्रमाणेच धातूंपासून क्रियापदे तयार होतात.

इ) मराठी प्रमाणे संयुक्त क्रियापदे होण्याची वृत्ती आहे.

ई) सहाय्यक धातू व सहाय्यक क्रियापदे वापरली जातात.

फ) वर्तमान काळ, भूतकाळ, भविष्यकाळ, रीतिभूतकाळ, आज्ञार्थ, विद्यर्थ आणि संकेतार्थ असाच काळ विचार या बोली संदर्भात करणे योग्य ठरते.

नमुन्या दाखल क्रियापदे (धातू) चालून पाहाणे उपयुक्त ठरेल.

१) अस

वर्तमानकाळ

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | आहे/हाये | आहे / हैती |
| द्वितीय पुरुष | हेस/हाये/ आहे | आह्यात/हायात/ह्यात |
| तृतीय पुरुष | व्हाये/आहे | हायात/ह्यात |

भूतकाळ

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | व्हता/व्हतो/ती | व्हतो/ |
| द्वितीय पुरुष | व्हता/व्हतीस | व्हता |
| तृतीय पुरुष | व्हता/व्हतं | व्हते/व्हता/व्हत्या/ व्हती |

रीतिभूतकाळ

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमपुरुष | असं | असांत/असत |
| द्वितीय पुरुष | असं | असांत/असत |
| तृतीय पुरुष | अस | असांत |

भविष्यकाळ

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | असल | असांल |
| द्वितीय पुरुष | असल | असांल |
| तृतीय पुरुष | असल | असत्याल |

आज्ञार्थ

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | अस/ऱ्हा | असा/ऱ्हा |
| द्वितीय पुरुष | अस | असा/ऱ्हा |
| तृतीय पुरुष | - | |

विद्यर्थ

| | एकवचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | अंस | असा |
| द्वितीय पुरुष | अस | असा |
| तृतीय पुरुष | अस | असा |

संकेतार्थ

| | एकवचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | झालो/झाले | झालो |
| द्वितीय पुरुष | झाला/झाली | झालां |
| तृतीय पुरुष | झाला/झाली/झालं | झालं झाल्या |

२) कर

वर्तमानकाळ

| | एकवचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | करतोय/करतो | करतोय/करतो |
| द्वितीय पुरुष | करतो/करीतोस/ तीस | करतां/करत्या |
| तृतीय पुरुष | करतो/ती/तं | करतात/त्यात/त्येत |

भूतकाळ

| | एकवचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | केला/क्येला/ ली/ल्ये | केला/ल्या/ ली/ल्ये |
| द्वितीय पुरुष | केला/ली/ल्ये/ल्या/ | केला/ल्या/ली/ल्ये |
| तृतीय पुरुष | क्येला/ली/ल्या/लं | केला/ल्या/ली/ल्ये |

रीतिभूतकाळ

| | एकवचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | करीत असं/करायचा/ची | करीत असं |
| द्वितीय पुरुष | करीत अस/करायचा/ची | करीत असं |
| तृतीय पुरुष | करीत अस | करीत असं |

भविष्यकाळ

| | | |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | करील | करूं |
| द्वितीय पुरुष | करील/करशील | कराल/करताना / करत्याल |
| तृतीय पुरुष | करील | करतील/करत्याल |

आज्ञार्थ

| | एकवचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | कर | करू |
| द्वितीय पुरुष | कर | करा |
| तृतीय पुरुष | -- | -- |

विध्यर्थ

| | एकवचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | करावी/वा/वं | करावा/वी/व्या/वं |
| द्वितीय पुरुष | करावा/वी/वं | करावा/वी/व्या/वं |
| तृतीय पुरुष | करावा/वी/वं | करावा/वी/व्या/वं |

संकेतार्थ

| | एकवचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | करतो | करतो |
| द्वितीय पुरुष | करतो/त्ये/ती | करतां |
| तृतीय पुरुष | करतो/त्ये/ती/सन | करत्यात |

धातूंप्रमाणे- मराठीतील धातुसाधितांच्या विचारांप्रमाणे डांगाणी बोलीतही धातूसाधितांचा विचार करता येतो.

iii) **अव्यय विचार**

डांगाणी बोलीत मराठीतील अव्ययांप्रमाणे अव्ययांचा विचार करता येतो.

**अ) क्रिया विशेषण अव्यये-**

स्थलवाचक- इड, तीठ, याअंगून, समदीकड, म्होरून, मंदी इ.

कालवाचक- मांगून, आज, उंद्या, झटक्यात, औंदा, चपलाइना इ.

संख्यावाच/परिमाणवाचक- लई, आखं, समदं, बेतशीर, थोडा थोडा पका उलिसा एक, पाच इ.

रीतिवाचक- उगीच, एरीच, फुक्काट, बरा, अस्सा इ.

ब) शब्दयोगी अव्यये- मंदी, पुढं, पोटी, पून, मंदून, यगळा, सरसा इ.

क) उभयान्वयी अव्यये- आन, आणि, पन, म्हून, कारनका, जर, तर इ.

ड) केवल प्रयोगी अव्यये- त्यहां, हत्ये, अगग, हाड, हट, थूः, भले, वा, गप इ.

इ) पालुपदे- ह्या, म्हन, तमंग, त्यंठ, का इ.

**४) डांगाणी बोलीचे स्वरुप :**

'चाळीसगाव डांगाण परिसर : सांस्कृतिक वाङ्मयीन आणि भाषिक अभ्यास' असा क्षेत्रीय अभ्यासावर आधारित टंकलिखित प्रबंध पुणे विद्यापीठात १९७९-८० मध्ये पीएच.डी. पदवीसाठी सादर केला होता. त्यात भाषिक अभ्यास या विभागात 'डांगाणी बोली'चे स्वरुप सोदाहरण स्पष्ट केले आहे. या बोलीची आवश्यक त्येव्हढी उदाहरणे परिशिष्टात नोंदविली आहेत. पुढे त्या बोलीचा जास्तीतजास्त उपयोग करून 'डांगाणी' आणि 'अहिनकुल' या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. प्रबंध आणि कादंबऱ्या यांतील प्रातिनिधिक उदाहरणे येथे दिली आहेत. त्यावरून डांगाणी बोली'ची तोंडओळख होईल. या बोलीचे स्वरुप सामान्यतः पुढील प्रमाणे दिसते-

प्रामुख्याने महादेव कोळी जमातीचे लोक या प्रदेशात राहतात. महादेव कोळी आणि ठाकर या दोहोंची भाषा पूर्ण मिसळून गेली आहे. तरी सुद्धा ठाकरांच्या बोलीची काही स्वतंत्र वैशिष्ट्ये राखलेली दिसतात. अर्थातच हे बोलीचे स्वरुप हे क्षेत्रीय अभ्यास ज्या कालावधीत केला त्या काळातील आहे.

**नामविचार** करता अकारान्त नामांची संख्या सर्वाधिक दिसते. सर्वसाधारण लकबी दिसतात त्या अशा- अकारान्त नामे अनेकवचनी होताना आकारान्त होतात. विशेष नामांची अनेकवचने होत नाहीत. स्त्रीलिंगी नामांचे अनेकवचने होताना वैविध्य आढळते. आकारान्त नामांचे अनेकवचन होताना ती अकारान्त होतात. स्त्रीलिंगी नामांची रुपे बदलत नाहीत मात्र शेवटी अनुच्चारित अनुस्वार येतो. इकारान्त नामे अनेकवचन होताना आकारान्त होतात. परंतु यातील पुल्लिंगी नामेरुप बदलत नाहीत. उकारान्त नामेही रुप बदलत नाहीत; मात्र अनुच्चारित अनुस्वार येतो. सर्वनामांचे पुरुषवाचक, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक असे प्रकार मराठी प्रमाणे करता येतात.

**नामविभक्ती** मराठी भाषेशी मिळतीजुळती आहे. सामान्यरुप करण्याची वृत्ती या बोलीतही आढळते. विशेषणांचे नामसाधित, धातुसाधित सार्वनामिक, दर्शक असे प्रकार करता येतात. अधिविशेषण व विधेयविशेषण वापरण्याची लकब मराठी प्रमाणेच आहे. एक ते वीस, व शंभर, हजार, लाख यांच्या पटीत संख्या वापरण्याची प्रथा आहे.

क्रियापदविचार सामान्यतः मराठी प्रमाणेच आहे

धातुंची संख्या विपुल असून सकर्मक, अकर्मक असा भेदही करता येतो. संयुक्त क्रियापदांचा वापरही होतो. सहाय्यक धातुंचा वेगळा विचार करावा लागतो. कर, टाक, सोड, लाव, अशा धातुंचा देखील सहाय्यधातू म्हणून उपयोग केला जातो. काळांचे प्रत्यय अर्थात आख्यात प्रत्यय मराठी भाषेला जवळचे किंबहुना त्या सारखेच आहेत. धातुसाधिते तयार करण्याची प्रथा आढळते. अव्ययांचे व्याकरणदृष्ट्या मराठी प्रमाणे वर्गीकरण शक्य आहे. पालुपदे हा प्रकारही मोठ्या प्रमाणावर वापरला जातो. वाक्प्रचार, म्हणी यां बाबतीत ही बोली समृद्ध आहे. भाषेची वाक्प्रचार म्हणी यांबाबतीत ही बोली समृद्ध आहे. भाषेची लक्षणीय वैशिष्ट्ये ही प्रामुख्याने गद्यशैलीतून स्पष्ट होतात. बोली नमुन्यांचा आणि त्यातून स्पष्ट होणाऱ्या भाषिक वैशिष्ट्यांचा विचार केला तर 'डांगाणी बोली' ही मराठी भाषेची प्रादेशिक बोली आहे; असा निष्कर्ष पुढे येतो. मराठी भाषेच्या व्याकरणानुसार या बोलीचे व्याकरण मांडता येते. मराठीची जवळपास सर्व व्याकरण वैशिष्ट्ये या भाषेत आहेत. एका परिसरातील अनेक मानवी समूह अगदी स्वाभाविकपणे संख्यात्मकदृष्ट्या प्रभावी समुहाकडून बोलीची उसनवारी करीत त्या मुख्य प्रवाहात मिसळून जातो असा निष्कर्ष सामाजिक भाषा अभ्यासाच्या दृष्टीने पुढे येतो. नाशिक, ठाणे, पुणे, नगर या चार जिल्ह्यांच्या सरहद्दीचा प्रदेश आदिवासी बहूल आहे मात्र या संपूर्ण प्रदेशाची बोली मराठी आहे हे सहज लक्षात घेता येते. एकूण 'डांगाणी' ही स्वतंत्र भाषा नाही तर मराठी भाषेची, डोंगर, दारिद्र्यातील मराठी बोली आहे. त्या प्रदेशाच्या नावाने ती 'डांगाणी बोली' किंवा 'डांगी बोली' या नावाने प्रदेशाचा निर्देश करीत व्यवहारात आहे.

❖❖❖

प्राचार्य डॉ. अनिल सहस्रबुद्धे
'आई', समर्थनगर, श्रीराम चौक, पाईपलाईन रोड,
अहमदनगर ४१४००३
फोन : (०२४१) २४२४१६७/९८८१५००९४२





अनुक्रमणिका

# माणदेशी बोली : एक अभ्यास

डॉ. सयाजीराजे आ. मोकाशी

भाषा ही एक सामाजिक संस्था असून, व्यक्ती-व्यक्तीमध्ये संज्ञापन साधणे हे भाषेचे मूलभूत उद्दिष्ट असते. समाज व्यवहार चांगल्या प्रकारे चालविण्यासाठी भाषेचा माणसाला उपयोग होत असतो. सामाजिक स्थैर्यासाठी आणि प्रगतीसाठी भाषा नेहमीच उपकारक ठरते. या भाषेत काही प्रादेशिक भेद असतात. एक विशिष्ट भाषा बोलणारा कोणताही समाज कधीच एकसंघ असत नाही. विविध कारणांनी त्यात वेगवेगळे गट निर्माण होतात. धर्म, वंश, पंथ, जात, परंपरागत व्यवसाय, सामाजिक मागासलेपण अथवा सुधारणा यामुळे समाज भिन्न गटात विभागला जातो. यातूनच बोली उदयास येतात.[१] या बोली प्रमाण भाषेशी नाते ठेवून असतात; पण प्रमाण भाषेहून भिन्नही असतात. बोली ही अधिक नैसर्गिक असते. ती जीवन व्यवहाराशी एकरूप झालेली असते. दैनंदिन, घरगुती अथवा कोणत्याही दोन व्यक्तींमधील संवाद भाषेपेक्षा बोलीतूनच होतो. कथन, निवेदन अथवा संभाषण यांसारखे भाषिक आविष्कार बोलीच यशस्वीपणे पार पाडू शकते. म्हणून बोलीचे महत्त्व वादातीत आहे.

मराठी भाषा ही भारतीय आर्यभाषा कुलातील एक मोठ्या लोकसंख्येत बोलली जाणारी महत्त्वपूर्ण भाषा आहे. डॉ. ग्रियर्सन यांनी एका शतकापूर्वी भारताची भाषिक पाहणी केली. त्यात त्याने मराठीच्या सत्तर बोलींची नोंद केली. परंतु मराठवाडा तसेच देशावरचे पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर, सोलापूर, अहमदनगर, नाशिक हे जिल्हे त्याच्या पाहणीत आले नाहीत. कोकणी, अहिराणी, वऱ्हाडी, नागपुरी व मध्यवर्ती मराठी असे काही मराठी भाषेचे प्रमुख प्रकार मानले जातात. यात मध्यवर्ती मराठी भाषा प्रांतात, पश्चिम-दक्षिण महाराष्ट्रात सातारा-सांगली-सोलापूर या तीन जिल्ह्यांच्या सीमारेषेवर 'माणदेश' हा एक भूभाग असून, तेथे 'माणदेशी' नावाची बोली भाषा बोलली जाते. तिचा विचार प्रस्तुत लेखात आपणास करावयाचा आहे.

**माणदेशाचे स्थान, भौगोलिक परिस्थिती आणि वेगळेपण**

माणदेश हा भूप्रदेश पश्चिम-दक्षिण महाराष्ट्रात येतो. ८४ अंश, २२ मी, ३० सें. ते ७५ अंश, ३० मी. पूर्व रेखांशावर माणदेश येतो. त्याचा अक्षांश १७ अंश उत्तर अक्षांश ते १७ अंश ५१ मी. ४१ सें. उत्तर अक्षांश असा आहे.हा प्रदेश सातारा, सांगली व सोलापूर या तीन जिल्ह्यांच्या सीमारेषेवर येतो. माण, आटपाडी हे संपूर्ण तालुके, खटाव तालुक्यातील एक गाव, सांगोला तालुक्यातील ८१ गावे, कवठेमहांकाळ मधील १३ गावे, जत मधील ३१ गावे, मंगळवेढ्यातील २२ गावे, पंढरपूरमधील १२ गावे माणदेशात येतात. माणदेशाचा पूर्व-पश्चिम विस्तार ११६.८ कि.मी. तर दक्षिण-उत्तर विस्तार ९१.२ कि.मी. इतका आहे. माणदेशाचे एकूण क्षेत्रफळ ४८,७०० चौ.कि.मी. असून, एकूण लोकसंख्या सुमारे ७ लाख इतकी आहे.

'माणदेश' म्हणजे भीमा नदीला उजवीकडून मिळणाऱ्या 'माण' नदीच्या खोऱ्यातील प्रदेश होय. राष्ट्रकूट घराण्यातील मानाङ्क राजाच्या नावावरून, तसेच 'माणदूर' या राजधानीवरून 'माणदेश' हे नाव या प्रदेशास मिळाले असावे, असे डॉ. कृष्णा इंगोले हे संशोधक म्हणतात.[२] माण ही मुख्य नदी या प्रदेशात असून, वाघजाई, वेलवण, कोरडा अप्रुफा या लहान नद्या माणगंगा नदीस मिळतात. माणगंगा माणदेशात १६३ कि.मी. प्रवास करते व सरकोली येथे भीमा नदीस मिळते.

या माणदेशाचे हवामान समशीतोष्ण असले तरी उष्ण व निमशुष्क आहे. माणदेशात सरासरी ५४० कि.मी. इतका पाऊस पडतो. ज्वारी, बाजरी, मटकी, कापूस, फळबागा तसेच शेती पूरक व्यवसाय यावर येथील जीवनमान अवलंबून आहे. देखणी खिलार जनावरे, शेळ्या-मेंढ्या, कायम दुष्काळी प्रदेश, सोशिक, संयमी जनता, बोर-डाळिंब फळबागा आणि वैशिष्ट्यपूर्ण माणदेशी बोली ही माणदेशाची प्रमुख वैशिष्ट्ये ठरतात.

**भाषा आणि माणदेशी बोली**

भाषा आणि बोली यांच्यात तसा फरक नसतो. परंतु विस्तृतता, स्थिरता, सर्वसमावेशकता आणि

प्रमाणबद्धता हे विशेष भाषेत दिसून येतात; तर लवचिकता, परिणामकारकता आणि जिवंतपणा हे गुण बोलीत आढळतात. जगात सुमारे तीन हजार भाषा असून, त्यांच्या कित्येक पटीने बोली भाषा जगभरात बोलल्या जातात. अशाच 'मराठी' या एका प्रमाणभाषेची 'माणदेशी' बोली ही एक स्वतःचे वेगळेपण दाखविणारी बोली आहे.

दर कोस अंतरावर पाणी बदलते, तर दर चार कोसावर भाषा बदलते असे म्हणतात. त्यानुसार माणदेशी बोलीचा स्थूलमानाने आपणास विचार करता येईल.

*'धन्य धन्य माणदेस । विठ्ठलें केला रहिवास ।*
*नामा म्हणे विष्णुदास । देई उल्हास भक्तिचा ॥'*

असा संत नामदेवांच्या अभंगात विठ्ठलाचा माणदेशात रहिवास असल्याचा उल्लेख येतो. मालू कवी विरचित 'श्रीनवनाथ भक्तिसार' या ग्रंथात माणदेशाला 'मानवदेश' म्हटले आहे.[३] रंगनाथ स्वामी निगडीवर, श्रीधरपंत नाझरेकर, ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज, संत सीताराम महाराज या संतांप्रमाणेच आधुनिक वाल्मिकी ग. दि. माडगूळकर, व्यंकटेश माडगूळकर, शंकरराव खरात, डॉ. भीमराव कुलकर्णी, म. गो. पाठक, डॉ. द. ता. भोसले, प्रा. अरूण कांबळे इ. अनेक लेखकांच्या साहित्यातून माणदेशाचे वेगळेपण सुस्पष्ट झाले आहे. तसेच गद्य साहित्यातून माणदेशी बोलीतील सहजसुंदर संवाद व्यक्त झाले आहेत. काही वैशिष्ट्यपूर्ण माणदेशी शब्द या साहित्यिकांच्या लेखनातून वेळोवेळी आले आहेत. हे शब्द मराठी प्रमाणभाषेत आढळत नसून, ते माणदेशी बोलीतून माणदेशात दैनंदिन जीवनात वापरले जातात.

व्यंकटेश माडगूळकरांच्या कथांची समीक्षा करताना सुप्रसिद्ध समीक्षक गंगाधर गाडगीळ यांनी 'खडक आणि पाणी' या ग्रंथात 'माणदेशी बोलींचा गौरवपूर्ण शब्दांत उल्लेख केला आहे.[४] माणदेशातील अनेक साधू-संत, लेखक, ग्रंथकार, विविध व्यावसायिक, शेतकरी, दोन सुग्यांना भिक्षा मागत फिरणारे भिकारी, लोकसंस्कृतीचे उपासक, देवादिकांचे भक्त इत्यादी अनेकांच्या मुखी ही माणदेशी बोली वर्षानुवर्षे पिढ्यान् पिढ्या बोलली जात आहे. अशा माणदेशी बोलीचे काही विशेष आपणास पाहता येतील.

**माणदेशी बोलीचे विशेष**

बोलींच्या लिखित अभ्यासाला अनेक मर्यादा पडतात. उच्चारणातील वेगळेपणा हाच बोलींचा प्रमुख विशेष ठरतो. स्वरांचे ऱ्हस्व दीर्घत्व, आरोह-अवरोह, तोकडे उच्चारण, उच्चारातील आघात, सानुनासिकत्व इत्यादी उच्चारणाचे बारीक सारीक विशेष जसेच्या तसे लेखी स्वरूपात दाखविता येत नाहीत. त्यामुळे काही व्याकरणिक विशेष आणि विशिष्ट शब्द प्रयोग यांच्या निर्देशावरच समाधान मानावे लागते. विविध बोलींचे विशेष ठरविताना लिखित अभ्यासातील मर्यादांचे भान ठेवणे आवश्यक असते. असे डॉ. गं. ना. जोगळेकर म्हणतात.[५]

माणदेशी बोली ही माणदेशात बोलली जाणारी एक महत्त्वपूर्ण बोली असून, सुमारे सव्वा सात लाख लोक ही बोली दैनंदिन जीवनात वापरतात.

माणदेशाच्या पश्चिमेस सातारी (मध्यवर्ती मराठी) भाषा बोलली जाते. ती मोठी कडक, खड्या आवाजातील, एखाद्याला सुनावल्यासारखी तिखट वाटते. भीवघाटाच्या दक्षिणेस कोल्हापूर-सांगलीकडे जैनी बोली बोलली जाते. जतच्या दक्षिणेस कानडी-मराठी मिश्रभाषा आढळते, तर पंढरपूरच्या पूर्वेस मराठी-तेलगू अशी संमिश्र भाषा बोलली जाते. तसेच माणदेशाच्या उत्तर बाजूस फलटण-बारामती-नगर बाजूस सौम्य नगरी भाषा आढळते.

सातारी भाषेचा कडकपणा सांभाळून, कानडीशी माणदेशी बोली अधिक जवळीक साधते. ही बोली मध्यवर्ती मराठी सारखी वाटत असली तरी तिचे वेगळेपण टिकून आहे. माणदेशात शिखरशिंगणापूर, म्हसवड, खरसुंडी, करगणी, सांगोला, जत, आरेवाडी, पंढरपूर येथे जनावरांच्या खूप मोठ्या यात्रा भरतात. या यात्रांना कानडी प्रदेशातून अनेक व्यापारी, दलाल, शेतकरी, यात्रेकरू देखणी खिल्लार जनावरे खरेदी करण्यासाठी येतात. त्यांच्या कानडीचा प्रभाव माणदेशी बोलीवर झालेला दिसून येतो.

**वैशिष्ट्ये**

स्वर व व्यंजने मराठी प्रमाणेच माणदेशीत असून, त्याच्या उच्चारणाचे काही खास विशेष आहेत.

१) काही ठिकाणी महाप्राण मिसळतात. उदा. हाकडे

(इकडे)

२) काही क्रियापदांची रूपे बदलतात. उदा. आलु (आलो), गेलु (गेलो), वसलु (वसलो)
स्त्रीलिंगी रूपे- आल्यी (आले), गेल्यी (गेली)

३) आद्य 'ए' चा उच्चार 'य' असा करतात. उदा. याक (एक) तसेच 'ओ' बद्दल 'वो' येणे हा कानडीच्या संपर्कामुळे मराठीत अला असावा. उदा. वोंगळ (ओंगळ)

४) 'इ', 'ई', 'ए' या स्वरांपूर्वी 'व' अस्पष्ट उच्चारला जातो. कधी कधी त्याचा लोपही होतो.
उदा. विस्तव- इस्तू, वीस - इस, वेळ - येळ, दिवस - इळ, विटी - इटी

५) कधी अनुस्वारांचा उच्चार केला जात नाही.
उदा. चिंच-चिच, गुंतला-गुतला, संपला-सपला, खुंटी - खुटी, विंचू - इच्चू

६) वर्णलोप होताना दिसतो. उदा. शहर - शार, चांदणी - चान्नी, महिना - म्हैना, लवकर - लगीच, एवढासा - उलिसा, विहिर - हिर, कळाला - कळ्ळा

७) 'ओ'चा 'व' होतो. उदा. ओकारी - वकारी, ओढाळ - वढाळ, ओटा- वटा, ओसरी - वसरी

८) 'वि'चा 'इ' होतो. उदा. विडा - इडा

९) 'श' ऐवजी 'स' येतो. उदा. शंकर - संकर, शेवटणे - सेवटणे

१०) 'ण' बद्दल 'न' येतो. दा. बहिणी - भनी, पाणी - पानी, पाहुणा - पाव्हना, गाणे - गाने

**उच्चारातील भिन्नत्व**

व्याकरणदृष्ट्या माणदेशी बोली मराठीला अगदीच जंवळची असून, माणदेशी खडतर, दुष्काळी जीवनाशी तिचे उच्चार एकरूप झालेले दिसतात. या प्रदेशात वारंवार दुष्काळ पडत असल्याने, येथील शेतकरी, व्यापारी, शेळ्या-मेंढ्या सांभाळणारे धनगर, गुराखी यांना नेहमीच जवळच्या समृद्ध भागात स्थलांतर करावे लागते. त्यामुळे वारंवार दुसऱ्या भाषेचा संपर्क आल्याने अनेक उच्चार सातत्याने बदलताना दिसतात.

उदा. ढेकूण - ढेकण - ढेकान - ढेकणं
ओंगळ - वोंगळ - वंगाळ - खेदा

काही माणदेशी शब्द वेगळेपणे उच्चारले जातात.
ततं (तेथे) हिंगा (हे घे) पुनिंदा (पुन्हा)

कधी कधी एक शब्द कितीतरी वदलतो. उदा. कृष्णदेव - कृष्णा - किसन - किश्ना - किसा - किसाप्पा

काही ग्रामवाचक नावांचा उच्चार प्रादेशिक केला जातो.

उदा.मंगळवेढा - मंगूडं, पंढरपूर - पंडपूर
सांगोले - सांगुलं, आटपाडी - अटपडी
म्हसवड - म्हसवाड, सिद्धनाथ - सिदोवा
यामाजी पाटीलाची वाडी - येपाची वाडी
दिघंची - डिगिजी

**काही इतर शब्द**

गव्ह (गहू), जुंदळं (ज्वारी), आखाड (आषाढ), नारिंद (नाराज), वट्ट (सर्व), चिल्लार (फिरंगु बाभूळ)

**कधी कधी एखादा शब्द संप्रदाय वेगवेगळ्या अर्थाने परिचित होतो.**

उदा. 'नाद करायचा न्हाय' किंवा 'नाद खुळा'

कधी 'म्या' (मी), त्वां (तू), ह्येनला (यांना), तेन्ला (त्यांना), ह्येनान्सी (यांच्यासाठी), त्येनान्सी (त्यांच्यासाठी), मपलं (माझे), तुपलं (तुझे)

तर कधी 'काय रे' साठी 'का रं' येते. कधी बोलण्याच्या ओघात 'रे' प्रत्यय येतो.

**माणदेशी बोलीत पत्नी नवऱ्याचा उल्लेख वेगवेगळ्या शब्दांतून करताना दिसते.**

उदा. नवरा मेंढ्या राखत असेल तर पत्नी म्हणते, 'आमचं 'मेंढक' थ्या डोंगराच्या थापाडीला मेंढरं चारत्यातं.'

कधी नवरा बैल सांभाळून शेती औजार चालवत असेल तर त्याची पत्नी म्हणते, 'ती न्हवं का, आमचं 'बैलकं' खालल्या खुटनात कुळवत्यात.'

**कधी नवीन वेगळीच क्रियापदे येतात.**

उदा. दगडाळणे (दगड मारणे), व्हलगाडणे (हिसका देणे), जांगडणे (पाय बांधणे), खेटारणे (कमी लेखणे).

ज्येचं याड तेला ग्वॉड
बरं विरूबाचं, नाव सुरूबाचं
माया-लेकी इनी इनी, तोंडात द्यायला न्हाइं कुनी
शिजला भात - जमलं गव ग्वात्
हितगुज एकजागी, गठळं दुयजागी.

लोकगीत-

''बुद्धीहाळला आल्य तळं
गावरवाडीचं गेल्यात मळं ।
सोमवडी उभून पळ
बुद्धीहाळ वरनं गेलाया नळ ।
हातीदाला उठलं कंजाळ
बनगरवाडी चढावर तळमळ ।
चिंध्यापारीवरनं गेलाया नळ
सारी चोपडी पाण्यामंदी खेळं ।''

मध्यवर्ती मराठी भाषेतीलच महाराष्ट्राच्या पश्चिम-दक्षिण भागातील एक बोली भाषा म्हणून माणदेशी बोली महत्त्वाची ठरते. या भाषेवर कानडीचाच प्रभाव अधिक दिसून येतो. ही बोली मध्यवर्ती मराठी भाषेसारखीच असून, उच्चारातील काही भेद व स्वतंत्र वैशिष्ट्यपूर्ण शब्द यांच्यामुळे तिचे वेगळेपण दिसून येते. पिढ्यान्‌पिढ्या बोलली जाणारी ही बोली माणदेशाचे वैभव ठरते. या बोलीत अनेक लोकगीते, म्हणी, वाक्प्रचार, गाणी, कवने असून व्यंकटेश मागगूळकर व अन्य लेखकांनी साहित्यातून माणेदेशी बोलीतील सुंदर संवाद योजून, मराठी भाषेचे दालन समृद्ध केले आहे. या माणदेशी बोलीचे सौंदर्य, आस्वादकांना खचित आनंद देईल, यात शंका नाही.

संदर्भ-


१) अभिनव भाषाविज्ञान- डॉ. गं. ना. जोगळेकर, पृ. १५४
२) माणदेश : स्वरूप आणि समस्या - डॉ. कृष्णा इंगोले, पृ. २
३) श्री नवनाथ भक्तिसार - कवी मालू - पृ. २९३, ओवी ५८
४) खडक आणि पाणी - गंगाधर गाडगीळ, पृ. २७६
५) अभिनव भाषाविज्ञान - डॉ. गं. ना. जोगळेकर, पृ. १६९


❖❖❖


**डॉ. सयाजीराजे आ. मोकाशी**
मु. पो. शेटफळे, ता. आटपाडी,
जि. सांगली ४१५ ३०६, फोन : (०२३४३) २६००८०







अनुक्रमणिका

# आदिभारती–
# भिलोरी बोली

प्रा. डॉ. पुष्पा गावीत

साहित्याचे, वाङ्‌मयाचे पूर्वरूप किंवा प्राथमिक स्वरुप हे बोलीभाषेचेच असते. संस्कृत, प्राकृत, अर्धमागधी, पाली, शौरसेनी या अतिशय प्राचीन भाषा मानल्या जातात. जोपर्यंत संस्कृत आणि पाली भाषेला राजाश्रय होता तोपर्यंत या दोनही भाषांमध्ये कालातीत साहित्याची निर्मिती झाली. संस्कृत भाषेत तर भारत, भवभूती, भास, कालिदास यासारखे श्रेष्ठ साहित्यिक उदयाला आले. यांनी लिहिलेले साहित्य आजही मराठी साहित्याचे लेणे म्हणून मिरवीत आहे. पण संस्कृत भाषा ही विद्वत्‌जणांची विशिष्ट वर्गाचीच भाषा होती. त्यामुळे राज्यलयाला गेल्यावर हळुहळू संस्कृत भाषेतील साहित्यनिर्मिती बंद होऊ लागली. पाली भाषा तर गौतमबुद्धाच्या बौद्ध धर्माच्या प्रचार आणि प्रसाराकरिता प्रसिद्ध झाली. आजही गौतमबुद्धाच्या जीवनकथा पालीभाषेत आढळतात. पण काळानुसार या समृद्ध भाषा लुप्त होऊ लागल्या. आज त्या साहित्यरुपानेच जिवंत आहेत. ज्या संस्कृत भाषेला आपण सर्व भाषांची जननी म्हणतो. देववाणी म्हणतो. ती भाषा आज मृत अवस्थेला आली आहे; कारण राजाश्रयापेक्षा लोकाश्रय महत्त्वाचा असतो.

प्राचीनकाळी ज्ञान संपादणे, ज्ञानग्रहण करणे आणि ज्ञानदान करणे या प्रक्रिया विशिष्ट वर्गापुरत्याच होत्या, त्याकाळी लिपी अथवा मुद्रण शोधही नव्हता. एवढेच काय कागदाचाही शोध लागला नव्हता; तेव्हा ऋषींमुनींकडून हजारो वर्षे श्रृती आणि स्मृतींच्याच सहाय्याने वेदांची निर्मिती केली जात होती. म्हणजे वेद निर्माण होत होते त्याकाळी संस्कृत भाषासुद्धा केवळ वाणीरुपातच होती म्हणजे फक्त बोलली जात होती. एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे मुखोद्‌गत होत होती. पण या संस्कृत, पाली भाषा जनसामान्यांच्या नसल्यामुळे, समाज व्यवहाराच्या त्या नसल्यामुळे, लोप पावल्या. याच भाषांच्या उपबोली अथवा पोटभाषा हळुहळू विकसित होत गेल्या. संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश मराठी अशा टप्प्याटप्प्याने आजची मराठी विकसित होत जाऊन ती प्रमाणभाषा म्हणून मान्य पावली आहे. फक्त मराठीच नव्हे तर भारतीय राज्यघटनेने एकूण १६ भाषांना राज्यभाषांचा दर्जा दिला आहे. सातत्याने या प्रमाण भाषांमधून नवनिर्मिती होत असते. प्रमाणभाषांच्या ज्या पोटभाषा अविकसित आहेत; त्यांना लिपी नाही. त्या अलिखित स्वरुपात आहेत, त्या पोटभाषांना आपण बोलीभाषा असे म्हणतो. माझी बोली राजस्थानी, गुजराती आणि मराठी या तीनही प्रमाणभाषांची बोलीभाषा आहे. विशेष म्हणजे ज्या शौरसेनी पासून राजस्थानी आणि गुजराती भाषा ज्या काळात उगम पावल्या; त्याच काळात या दोनही भाषांबरोबरच हातात हात घालून 'भिलोरी' बोलीही उगम पावली आहे. पण राजस्थानी आणि गुजराती भाषांना राजाश्रय मिळाला. त्या विकसित होण्यास परिस्थिती अनुकूल झाल्याने, त्यांनी लिपी स्विकारल्याने, त्या भाषांमधून प्रारंभिक अवस्थेपासूनच साहित्य निर्मिती होत गेली. आदिवासींच्या बोली अविकसित राहिल्या. मराठीच्या सुमारे ६५ बोलींपैकी भिल्ली बोलींच्या ३६ बोली त्याचप्रमाणे गुजरातींच्या सुमारे ३९ बोलींपैकी एक भिलोरी अशी या भिलोरीची अवस्था असतानाही ती अलिखित आणि लिपीविना राहिली.

भारतात सुमारे १७९ भाषा व ५४४ बोलीभाषा आहेत. त्यापैकी ११६ भाषा व ४०० बोली या आदिवासींच्या आहेत. लिखित आणि अलिखित अशा भेदामुळे अलिखित बोलीभाषांची दुर्बोधता वाढली आहे. आदिवासी बोलींपैकी फक्त 'गोंडी' बोलीला लिपी होती. अलिकडच्या काळात 'संथाळी' बोलीला लिपी मिळवून देण्याचा प्रयत्न झाल्याचे दिसते. महाराष्ट्रात एकूण ४७ आदिवासी जमाती आहेत, त्यापैकी पश्चिम खानदेशात एकूण अठरा जमाती आणि त्यांच्या एकूण २१ बोलीभाषा आहेत. कोकणा जमातींच्या (डांगी कोकणी आणि बुंदाडी कोकणी) या उपबोली आहेत तर भिलाल/भिल्ले ही आणि एक आदिवासी जमात आहे. या बोलींपैकी कातुडे ही जमात आणि त्यांची बोली आता काळाच्या ओघात लुप्त झालेली दिसते. खानदेशात या सर्व बोली स्वतंत्र आहेत आणि अलिखित आहेत. पश्चिम खानदेशातील आदिवासी बोलींच्या या विविधतेमुळेच महाराष्ट्र शासनाचा मातृभाषेतून प्रमाणभाषेकडे वळविणारा आदिवासी विद्यार्थ्यांचा प्राथमिक शिक्षणाचा प्रयोग फसला. मात्र, मराठी

साहित्यात या आदिभारतीचे योगदान महत्त्वपूर्ण ठरले.

लोकसाहित्याच्या अभ्यासकांनी प्रादेशिक लोकसाहित्य अभ्यासण्याच्या अनुषंगाने काही प्रमाणात आदिवासी बोलीभाषांमधील लोकवाङ्मय विशेषतः लोकगीते देवनागरी लिपीतून शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न केला. यात डॉ. गोविंद गारे आघाडीवर होते. त्यांनी महाराष्ट्रातील ''आदिवासींची लोक गीते' संवादित आणि प्रकाशित करून मराठी साहित्यात आदिवासी बोलीतील साहित्याची मुहूर्तमेढ रोवली. कालांतराने कॉ. वाहरू सोनवणे यांचा 'गोधड' हा काव्यसंग्रह आला. या काव्यसंग्रहातील दुसरा भाग भिलाऊ बोली (कोटली) भाषेतील आहे. दुसरा काव्यसंग्रह 'माझी सनद कुठे आहे?' या शीर्षकाचा सी. सी. राठवा सर यांचा आहे. यांच्या या काव्यसंग्रहातील दुसरा भाग भिलोरी (देहवाली) बोलीभाषेतील कवितांचा आहे. हळुहळू माझ्या मायबोलीतील साहित्य मराठी सारस्वताच्या दरबारी रूजू होत आहे; आणि मराठी साहित्यातील आदिवासी बोलीतील साहित्याचे दलान समृद्ध करण्यास लेखक सरसावले आहेत. कॉ. नजुबाई गावीत यांच्या आत्मचरित्रात्मक कादंबऱ्यांनी दमदारपणे मराठी साहित्यात प्रवेश केला आहे. तीन भागात ते प्रसिद्ध झाले आहे. अनुक्रमे 'आदोर', 'राप' आणि 'तृष्णा'. अलिकडे त्यांची 'भिवा फरारी' ही ऐतिहासिक कादंबरीही प्रसिद्ध झाली आहे. पश्चिम खानदेशातील पहिल्या आदिवासी बोलीतील लेखिका म्हणूनत्यांनी लौकिक संपादन केला आहे. त्यांचे आदिवासी बोलीतील हे साहित्य मराठी साहित्यात मोलाची भर टाकण्यात यशस्वी ठरले आहे. त्याचप्रमाणे बडोदा येथील 'भाषा संशोधन आणि प्रकाशन' संस्थेचे संचालक डॉ. गणेश देवी यांनी 'ढोल' या अर्धवार्षिक अंकाच्या प्रकाशनानिमित्ताने सुभाष पावरा, सी. सी. राठवा या सारख्या अभ्यासकांना प्रेरणा देऊन आपल्या बोलीतून साहित्य लिहिण्यास प्रेरित केले. उत्तेजन दिले. सुभाष पावरा यांनी 'पावरी बोली'तील 'ढोल'चे संपादन केले; तर राठवा सरांनी भिलोरी (देहवाली) बोलीतील अंकाचे संपादन केले. शिवाय सुभाष पावरा यांनी 'हातपुडान सान्निध्यमय आदिवासी संस्कृती' हे संपूर्णपणे 'पावरी' बोली भाषेतील पुस्तकही संपादित आणि प्रकाशित करून मराठी साहित्यात महत्त्वाची भर टाकली आहे. विजया जडे सोनार यांनी-कोकणी बोलीतील लोकवाङ्मय लिहिले.

ख्रिस्ती धर्मप्रसारकांनी आदिवासी भागात धर्माचा प्रसार करण्यासाठी 'बायबल'चे भिलोरी भाषेत भाषांतर करून छापले होते. मुळातच या बोली दुर्बोध आहेत. अनुनासिक उच्चार आणि बंगालीसदृश्य बोलण्याची शैली यामुळे त्यातील शब्द आणि अर्थ अनाकलनीय वाटतात. पण लिहिण्यास देवनागरी लिपीत लिपीबद्ध करण्यासही शब्द अवघड वाटतात. शिवाय हजारोवर्षापासून या बोली ध्वनिरूपातच असल्याने, आणि आदिवासी जमातींचे वास्तव्य राना-वनांच्या, डोंगर-दऱ्यांच्या सहाय्याने असल्यामुळे, शतकानुशतके या जमाती अदृश्य होत्या. त्यामुळे त्यांच्याबद्दल गैरसमजच अधिक होते. १९व्या शतकाच्या अखेरच्या पर्वापासून ज्ञानाचा प्रकाश सर्वत्र पसरल्यावर या आदिवासी जमातीच्या दारीही शिक्षणाची गंगा पोहोचली. हळूहळू आदिवासी बोलींमधील साहित्य लिहिले जाऊ लागले; आणि मराठी साहित्यातील आदिवासी बोलींचे दालन दखल घेण्याएवढे स्वतंत्र असल्याचे जाणवू लागले.

राजस्थानी आणि गुजरातीबरोबर उदयाला आलेली माझी मायबोली भिलोरी अविकसित जरी राहिली; तरी तिची शब्दसंपदा व्यापक आहे. म्हणूनच ती पश्चिम खानदेशातील आदिवासींची सामाजिक व्यवहाराची भाषा आहे. त्यामुळे या बोलींतील साहित्य अधिक प्रभावी वाटते. म्हणूनच भिलोरी बोलीत बायबलचे भाषांतर करावेसे ख्रिस्तीधर्मप्रसारकांना आवश्यक वाटते. एवढेच नव्हे; तर डी. एस. भावची यांनी 'होबदाहा चोपडी' हा भावची-हिंदी बोलीतील शब्दकोश प्रकाशित करून मराठी साहित्यातील शब्दकोशांचे दालनही समृद्ध करण्याच्या दृष्टीने पाऊल वाट तयार केली. माझ्या मायबोलीतील साहित्य कोणत्याही अंगाने दुय्यम ठरत नाही असा माझा ठाम विश्वास आहे. कॉ. वाहरू सोनवणे यांच्या 'गोधड' या शीर्षक कवितेतील आत्मचिंतन पाहू. भिलोरी (कोटली) बोलीभाषेतील ही कविता आहे.

*'हामला आखतरं आखतं आदिवासी*
*हामनअ संसारला दुरतीच कुत्र भुकत*
*गोधड देखवा हामन झालरवालं*
*फाटीतुटीन आतड बाहेर*
*गोधड फगखात तर गोधडेस्या चांदबाबा देखाय*
*हामनी वसतीला दुरतीच वैखी लेत*

*हामना संसारला हामूच हासत*
*हासी हासीन कतल्क हासत*
*बदला, बदला रं बदला दुनिया सारी'*

आपल्या समाजजीवनाचे एवढे परखड वास्तववर्णन कवीने आपल्या काव्यसंग्रहाच्या शीर्षककवितेतून केले आहे. ह्या विचारांमध्ये समाजचिंतन आहे, स्वसमाजाच्या परिस्थितीची जाणीव आहे, भविष्य उज्ज्वल आहे असे ठामपणे व्यक्त करण्याचा विश्वास आहे आणि आताही परिस्थिती बदलून टाका असे कळकळीचे आवाहन आहे.

दुसरे कवी सी. सी. राठवा सर आपल्या 'पोयरे जोजवे' या कवितेतून आदिवासी भागातील शिक्षणाची दुरावस्था व्यक्त करतात.

*"पोयरें जोजवे पोयरें, सालायू खातोर*
*हारें रे का माठे रे, हाने वेअ्क् मोडें वे*
*वेहे चुकलेंबी चाली, जुवान रे क् डायेरे*
*आमाँ माँअही... आमाँ साल टिकवां खातोर*
*होदी दया रं दादू हूँ... तुमाज जीवापे डेड चाले*
*पेन एक गोठ आखा ?*
*साला खातोर पोयरें का पोयरांहां खातोर साल*
*पोयरांहां डेडी खातोर का तुमाँ डेडी खातोर"*

"शाळेसाठी मुले हवीत, चांगली-वाईट, लहान मोठी आणि डंगरीसुद्धा चालतील (वेह चुकली). तरुण असो किंवा म्हातारी असोत, पास असो वा नापास कशीही चालतील, फक्त मुले पाहिजेत शाळेसाठी. आमची माणसं आणि आमचे हे वर्ष पूर्ण करण्यासाठी. द्याना ना शोधुन बाबा-दादांनो ! अन्यथा एक दोन महिन्यानंतर आमचे खरे नाही, तुम्हीच आमचे मायबाप आहात तुम्हीच आमचे अन्नदाते तुमच्या कृपेनेच आमचे पोट भरते." शिक्षकाची ही विनवणी ऐकून एक ग्रामस्थ म्हणतो- हाँ हाँ दादासाब खेमखा' म्हणजे हो दादासाहेब जरा श्वास घ्या, शांत व्हा. मुले तर शोधुन देऊ त्यांना शाळेत पाठवू पण एक सांगा ? 'साला खातोर पोयरे का पोयरा खातोर साला?' या ओळीत कवितेचा मतितार्थ दडला आहे. शिवाय कवीने शब्दभ्रम निर्माण केला आहे. (भिलोरी बोलीत **शाळेसाठी साला** हा शब्द आहे तर **वर्षासाठी साल** हा शब्द आहे) म्हणजे 'साला' हा शब्द द्वयअर्थी आहे. शाळेसाठी की वर्षभरासाठी मुले हवीत. की हे वर्ष मुलांकरिता आहे की तुमचे दिवस काढण्यासाठी आहे. (वर्षासाठी मुले की शाळेसाठी मुले ?) हा प्रश्न आदिवासी खेड्यामधील शाळेचे विदारक चित्र उभे करते. पुढच्या ओळीत कवी म्हणतो **'पोयरा हाँ डेडी खातोर का तुमा डेडी खातोर'** म्हणजे शिकून सवरून मुलांना रोजगार मिळेल की ही मुलं तुमच्या रोजगारासाठी आहेत ? आधी हे स्पष्ट करा. मुलं शोधून देऊ पण गरज संपली की ढुंगण पुसून फेकू नका' राम राम या आता.

संवादशैलीतील ही भिलोरी बोलीतील कविता शब्द, आशय, वाङ्मयीन सौंदर्य कोणत्याही बाबतीत उणी नाही.

असे आशय संपन्न, वास्तव जीवन दर्शन घडविणारे आदिवासी साहित्य मराठी सारस्वताच्या दरबारात रूजू होत आहे म्हणून आदिवासी बोलींच्या शब्दकोशाची निर्मितीही काळाची गरज ठरली. ती गरज माझा शब्दकोश निश्चितच पूर्ण करेल.

अशा आशय घन, जीवनवादी साहित्याची निर्मिती आता माझ्या बोलीतूनही होत आहे. 'गोधड' ते 'माझी सनद कुठे आहे ?' 'आदोर' ते 'भिवा फरारी' आणि 'होवदाहा चोपडी' ते 'प. खानदेशातील आदिवासी बोलीभाषांचा शब्दकोश' हा माझ्या बोलीभाषेतील साहित्याचा प्रवाह आता अभ्यासकांना अनुल्लेखित करून पुढे जाता येणार नाही. ज्या आत्मविश्वासाने माझ्या बोलीभाषेतील साहित्याची निर्मिती होत आहे ते साहित्य वाचकांना अभ्यासकांना समजून घेता यावे. माझ्या बोलीतही विविध अर्थच्छटा आहेत, शब्दसौंदर्य आहे, आशय व्यक्त करणारे प्रभावी शब्दही आहेत. हे सहजपणे कळावे याकरिता मी 'पश्चिम खानदेशातील आदिवासी बोलीभाषांचा शब्दकोश' तयार करून प्रकाशित केला आहे. त्यामुळे आदिवासी बोलीतील साहित्य समजून घेण्यातील अडसर दूर होईल.

आजपर्यंत आदिवासी साहित्य म्हणजे प्रमाणभाषेतून आदिवासी लोकजीवन, त्यांच्या परंपरा, यांचा अभ्यास केला जात होता. आता प्रत्यक्ष त्या बोलीभाषेतून साहित्य निर्मिती होऊ लागल्यावर वाचकांनी, अभ्यासकांनी ते समजून घेऊन माझ्या बोलीतील साहित्यावर चर्चा करावी.

❖❖❖

**प्रा. डॉ. पुष्पा गावीत**
विद्यावर्धिनी कॉलेज, धुळे
व्यंकटेश प्लाझा, एस-२, जानकी नगर,
वाडीभोकर रोड, देवपूर, धुळे.
भ्रमणभाष : ९४२१५३१००५





अनुक्रमणिका

## वऱ्हाडी बोलीची कविता
डॉ. प्रतिमा इंगोले

वऱ्हाडी ग्रामीण साहित्यात वऱ्हाडी बोलीचे दालन खूप समृद्ध आहे. ग्रामीण साहित्याचा इतिहास पाहता सर्वांत आधी त्याच्या लेखनास सुरुवात झालेली आहे. विशेष म्हणजे ह्या सर्व साहित्यात 'वऱ्हाड' ही भूप्रदेश सजीव आणि जिवंत झाला आहे. तर वऱ्हाडातील निसर्ग ह्या साहित्यात साक्षात् उभा ठाकला आहे. अगदी पंढरीच्या विठूसारखाच ! विदर्भाची अनभिषिक्त सम्राज्ञी असणारी. 'वऱ्हाडी बोली' ह्या साहित्यातून अगदी महानुभाव साहित्यापासून आत्मस्पर्शी आणि आत्मसाक्षात्कारी स्वरुपात प्रकटली आहे. हे ह्या साहित्याचे आगळे वैशिष्ट्य आहे. ह्या साहित्याची सुरुवात तशी गाडगेबाबांच्या कीर्तनांपासून झाली असली, तरी नंतर ही परंपरा अनेकांनी समृद्ध केली आहे. ग्रामीण कवितेचा जरी विचार केला तरी ती किती सकस आहे ह्याचा प्रत्यय वारंवार येतो.

**ग्रामीण कविता**

वऱ्हाडी ग्रामीण कवितेची सुरुवात थेट रविकिरण मंडळाच्या काळात म्हणजे १९३० ला झालेली दिसून येते. ती थेट बोलताना दिसते.

'एक हात खोदावी जमीन हे पूजनाहूनि पूजन । परिणाम शेकडो व्याख्यानांहून तयाचा' असे राष्ट्रसंत ग्रामगीतेतून म्हणतात. (ग्रामगीता अं. १८ ओळी २०) शेतीत राबणे हाच खरा धर्म आहे असेच ते त्रिवार सांगतात. त्यानंतर 'पां. श्रा. गोरे, वि. भि. कोलते, शरदचंद्र सिन्हा, भाऊ मांडवकर असे बिनीचे कवी वऱ्हाडी कवितेला आणि पर्यायाने वऱ्हाडी बोलीला ठाशीव समृद्धी देत गेले. वऱ्हाडी बोलीला आत्मस्वर देण्याचे महत्त्वाचे कार्य पां. श्रा. गोरे ह्यांनी केले. 'बोवडे बोल' (१९३२) चा जरी फक्त विचार केला तरी ह्याचा प्रत्यय येतो. त्यांच्या कवितेतील पीळ पाडणारे शेतकऱ्याचे चित्रण आजच्याही काळाला लागू पडते.

'गवताचे खोपट पडके
मातीचे ढोबर फुटके
कवितेचे सडक्या पुडके
धन दौलत इमला सारा
का विचारता नावाला ?
कधि करून मोलमजुरी
पाडितो पसाभर पदरी
बुरसल्या शिळ्या भाकरीचे'
हे तुकडे मम आहारी ('बोबडे बोल' पृ. ४६)

ह्यात खोपट, ढोबर, इमला इत्यादी वऱ्हाडी बोलीतील शब्द गोरे आवर्जुन वापरतात. इतरही कवितेत झाकट, आडुत, अनशापोटी, असे कितीतरी शब्द कवितेचा आशय भरीव करतात. म्हणूनच आनंद यादव म्हणतात. 'या भाषेचे वैशिष्ट्य असे की, तिचा सूर ग्रामीण आहे. ग्रामीण भाषेच्या ठेवणीचा स्पर्श तिला झाला आहे.' हे अगदी खरे आहे. वऱ्हाडी बोलीतील कितीतरी शब्दांना गोरेंचा अमृतस्पर्श लाभून ते शब्द अमर झाले आहेत., हेल, माय, तपला, चिंधी, गोदडी, घामाझोकल, गोटे, वावर, पेव, कणगी, झळी, विख, पाळू, धुरा, सेव, तिरीप, पऱ्हाट्या, होका इ. खास वऱ्हाडी मातीचा स्पर्श असणारे शब्द गोरेंच्या कवितेला श्रीमंत करतात. तसेच गोरे ह्या शब्दांना वैभव प्राप्त करून देतात. पर्यायाने वऱ्हाडी बोलीलाही ! १९३२ पासूनच अशी वऱ्हाडी बोली पुन्हा नव्याने कवितेतून नांदायला लागली आहे.

१९३३ साली प्रकाशित झालेला डॉ. वि. भि. कोलते यांचा 'लव्हाळी' हा संग्रहही भाषेच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. नळगंगेच्या पाण्यावर पोसलेला डॉ. कोलतेंचा पिंड जितका सशक्त आहे तितकीच 'लव्हाळी'तील कोलतेंची वऱ्हाडी बोलीही !

'कराया पेरनी । तुम्हि चाला व ! समध्या जनी ॥
भाजी भाकर लवकर रांधा
मोहन, ठेसा, त्यावर कांदा
पालवामधी चटकन बांधा
न्याहरि घेऊनी । तुम्ही चाला (लव्हाळी पृ. ६९)

ह्यात चाला, समद्याजनी, ठेसा, पालव, न्यायरी, बापुया, सारखे खास वऱ्हाडी शब्द त्या कवितेतील अर्थाला अलंकृत करतात. पेरणीची घाई साक्षात् उभी करतात. बोलीभाषेच्या वापरामुळे कोलते ह्यांची कविता



अनुक्रमणिका

ठसकेबाज व पारदर्शी झाली आहे. स्वतः कोल्तेच आपल्या कवितेविषयी म्हणतात.

'माझ्या विद्यार्थीदशेत माझ्या सारख्या खेडवळ मुलाने अशाच भाव-भावना अशाच भाषेत व अशाच शब्दात व्यक्त करणे स्वाभाविक होते.

'माझ्या लव्हाळी या काव्यसंग्रहातील गालबोट, अंगाई, आटपाटनगरात, लव्हाळी, मला आठवल्या. त्यात हाड्या, शेव, आकू, चिडी, मोहन, झिकोला, चाहाळ वैगरे शब्द वापरल्यावद्दल त्यावेळचे सुशिक्षित कवी मला किती हसत होते व माझी कशी टिंगल करीत होते. हेही आठवले.' (भुलाई प्रस्तावना पृ. ११) अर्थात् हे शब्द वापरल्याबद्दल नंतर त्यांना सार्थकताच वाटली हे स्पष्ट दिसून येते. हेच वऱ्हाडी कवितेचे आणि बोलीचे वैशिष्ट्य आहे. निखळ बोलीतून शरदचंद्र सिन्हांनी कविता लिहिली. त्यांचा 'वऱ्हाडमाती' संग्रह वऱ्हाडी माणसाचं दुसरं रूप आहे.

'माती अरे माती, मायची गा, माय
धरतीची साय, कयीशार' (वऱ्हाडमाती पृ. १)

वऱ्हाड माती, माय आहे. ती चंदनाची कूस आहे. तिचं मन सायीसारखं कोमल आणि शीतल आहे. तर 'पूर्णा' नदी वऱ्हाडची गंगा आहे.

'बोली माही बोली ।
गुयाची बा राब ।
सांभायते आब ।
गांवरानी ॥ ('वऱ्हाडमाती' पृ. ५)

वऱ्हाडी बोलीचे वैशिष्ट्य ते असे ठासून सांगतात. वऱ्हाडी बोली गुळाचा पाक आहे. आणि तिला खानदानी सौंदर्य लाभले आहे.

शरदचंद्र सिन्हा ह्यांनी वऱ्हाडी बोलीला चिरतारुण्य बहाल केले आहे. ते त्यांच्या 'मिरुगाच्या बरसाती' तून. ह्या कवितेने सर्वांना पागल केले होते.

'मिरुगाच्या बरसाती
व मिरुगाच्या बरसती
व्हते कसी वली माती
व मिरुगाच्या बरसाती'

शब्दांच्या आवर्तातून एक विशिष्ट नाद उत्पन्न करीत सिन्हा श्रोत्यांना भारून टाकीत. वऱ्हाडी बोलीचं गोंदण त्यांच्या मनावर उमटवीत. एक नादमय असं विश्व त्यांनी वऱ्हाडीला वहाल केलं आहे; आणि तेच सोटेंनी घरोघरी पसरविलं. त्यांची, सोटेंची कविता गेय नव्हती पण तिला नाद होता. सोटेंनी जाणीवपूर्वक वऱ्हाडी भाषा वापरली. रुजवली. लोकप्रिय केली.

'कव्हा कव्हा सिनेमात
दिवे जाते इझून, मंग दिसत नायी अंधारात
म्हून म्हने इच्यार केला कंदील घेऊन जाऊ
दिवे इझले म्हनजे, आपून सिनेमा पाहू.
(सोटेशाही, पृ. ३९)

स्व. वामनराव चोरघडेंनी 'सोटेंच्या वऱ्हाडी भाषेचा लवचिकपणा चटकन भावतो' असे म्हटले होते. त्यांच्या कवितेतील वऱ्हाडी मार्मिक आणि खेळीमेळीची वाटते. रंजनाबरोबर उपहासयुक्त टीका त्यांची कविता अंगिकारते. भाय, वानावानाचं, वयख, वजर, कल्ला, सारखे कितीतरी खास वऱ्हाडी शब्द सोटे वापरतात.

'म्हून म्हनतो वऱ्हाडीले साहित्यात जागा द्या
थोडा तरी आतापासून वरचा तिले मान द्या.'
(सोटेशाही, पृ. २१)

हे मात्र खरे झाले आहे. ग्रामीण साहित्यात वऱ्हाडी साहित्य आज सन्मानाने उभे आहे. त्याला कारण विठ्ठल वाघांची कविता आहे. वाघांच्या वऱ्हाडी कवितेने समग्र वऱ्हाडी जीवनाचा वेध घेत जनजीवन भारून टाकले आहे. विठ्ठल वाघांची कविता वऱ्हाडी बोलीचे लेणे आहे. त्यांच्या कवितेने वऱ्हाडी बोलीला अक्षरत्व मिळवून दिले आहे.

'काय सांगता गोळाई इच्यामंदी सहेदाची ।
अखोजीच्या चिचोऱ्याची, दिवाईच्या पुरनाची ॥'

वऱ्हाडी बोली अशी नादमधुर आहे. आणि तिचं हे सौंदर्य वाघांनी सातासमुद्रापार नेलं आहे. त्यांच्या कवितेत वऱ्हाडीचे मर्म व्यक्त झालेले आहे.

'गेला दिवस कलून
तुवा रिकामा झोयना ।
बोंडासाठी कशी लवू
मले आठवा मयना ॥'

कळने, तुवा, झोयना, लवने, सारखे कितीतरी अव्यक्त वऱ्हाडी शब्द वाघांच्या कवितेने सगुण साकार केले आहेत. त्यानंतर शंकर बडेंनी तिला वस्त्रालंकारांनी नटवले आहे.

'सारे गेले पावसाये आता लागले उन्हाये
गढीतल्या मातीले रे माती खायाचे डोहाये' (रित)

मिर्झा रफी अहमदबेग यांनीही वऱ्हाडीचा पुरस्कार केलेला आहे.

डॉ. प्रतिमा इंगोले ह्यांचा 'भुलाई' (१९९७) काव्यसंग्रह तसा उशिराच प्रकाशित झाला पण त्यात त्यांनी वऱ्हाडीचा सर्वंकष वापर केला आहे.

'फुलोर नवाळा, त्याईचं बोलनं,
त्यातून फुललं, भुलाईचं गानं (मनोगत- भुलाई, पृ. १४)

गावातील अभागी बहिणींचं गाणं त्यांच्या शब्दात मांडत असल्याची भूमिका त्यांनी सुरुवातीलाच घेतलेली आहे. 'साधंसुधं लेनं जसं । तसे माये वऱ्हाडीचेबोल/ चाकोलीवानी उमटली, त्यात अंतरीची ओल ।' असे त्या म्हणतात. (वऱ्हाडी बोल- भुलाई, पृ.१९)

बहिणाबाईंची कविता वऱ्हाडी-खानदेशीत आहे. खरे तर ती वऱ्हाडीच आहे. चार दोन शब्द फक्त अहिराणीच्या सान्निध्याने आलेले आहेत. त्यातही फक्त प्रत्ययप्रक्रिया तेवढी वेगळी आहे. 'भुलाई' काव्यसंग्रहाला 'डॉ. वि. भि. कोलतें'सारख्या भाषातज्ज्ञांची प्रस्तावना लाभली आहे. त्यात त्यांनी भुलाईच्या भाषेचे वैशिष्ट्य आवर्जुन नोंदविले आहे. ते म्हणतात, 'भुलाई-बाहुली पण हिलाच आम्ही 'भुलजाइ'' म्हणत असू ! 'रडु नको गं ! अं हं ! मी देते बाईला भुलजाई' हा शब्दांच्या प्रयोगातील फरक नेहमीच आढळतो. असे अनेक शब्द प्रा. इंगोले यांनी आपल्या कवितेत वापरलेले आहेत. उदा. हनहन, (उपेक्षा), गंगायी (गंगाळ), सिखा (शॉवर), झेंडवाई (गवताने तयार केलेले दिवे व देवी ठेवण्याचे साधन), दाथर (दाट थर), खाईवर घालणे (नाईलाजाने देणे), उरावर बसणे (अट्टाहास धरणे), भलकशी (खूप), खंदाळी (कापूस वेचण्याला केलेली झोळी), शेवळी (छोटी विहीर), पिल्या (कावीळ), झाकुली (पहाटे) वगैरे अनेक ठिकाणी ण-न, ळ-य, ळ-ल, वगैरे शब्दोच्चार आलेले आहेत. ते ग्रामीणबोलीचे द्योतक आहेत. त्यांचा उपयोग प्रा. इंगोले यांनी आपल्या कवितेत विपुल प्रमाणात केला आहे. तो वस्तुस्थितीचाच निदर्शक आहे. आजकाल शुद्धीकरणाच्या व सौंदर्याच्या नावाखाली त्यांचे शहरवासीय जनतेत प्रचलित असलेले उच्चार वापरतात. एका दृष्टीने माझ्या मते हे इष्ट नाही. त्यामुळे बहुसंख्य लोकांच्या भाषेचे स्वरुप नाहीसे होते. लिहिताना शब्दातील अक्षरांचे उच्चार मुळाप्रमाणे कसे लिहावे, याचाही उच्चारदृष्ट्या शास्त्रशुद्ध विचार होणे आवश्यक आहे. पण 'काव्यसंग्रहा'तील भाषेचा विचार करताना त्या भानगडीत पडणे इष्ट नाही व आवश्यकही नाही.

लोकभाषेचे संरक्षण करणे आवश्यक आहे. असे महत्त्वाचे विधान पद्मश्री डॉ. कोलते करतात त्याची नोंद घेणे गरजेचे आहे. त्यातून लोकभाषेचे संवर्धन करणे आणि त्यासाठी साहित्यातून तिचा वापर करणे आवश्यक आहे हेच डॉ. कोलते आवर्जुन सुचवितात.

तर मीरा ठाकरे ह्या गेय कविता रचणाऱ्या कवयित्रीने वऱ्हाडीचे माधुर्य नव्याने अधोरेखित केले आहे.

'जशी भागीरथी नदी, माही मायबोली मोठ्ठी
मनामनाच्या बांधल्या, जशा रेशमाच्या गाठी'
(मायबोलीच्या प्रेमानं)

भाषेत आणि बोलीत हाच महत्त्वाचा फरक आहे. भाषा औपचारिक बोलते. पण बोली काळजाला हात घालते. बोलीच्या वापरात मंगलमय जिव्हाळा असतो. जो तनामनाला तृप्त करतो. मीरा ठाकरेंच्या कवितेत गेयतेबरोबरच नादमयता आहे. त्यामुळेच ती मनात रूतून बसते.

'घाम अंगाले जिरते, मजा कोनरे लुटते ।
नई गाठ धोतराले, त्याच्या दर्रोज पडते॥
सोनं चांदी पिकोते रे, किती सोसून रे घाव ।
माल नेता बजारात, कसा उतरते भाव ॥
सनासुदीच्या दिसाले, याले घडते उपास ।
असा वऱ्हाडी मानूस, असा वऱ्हाडी मानूस ॥'
(वऱ्हाडी मानूस)

अशा रीतीने वऱ्हाडी बोलीचे सहज सुंदर, सुलभ दर्शन कवितेतून घडते. ओघवत्या शैलीत वऱ्हाडी जीवन त्यांच्या कवितेतून साकार होते. मनाला भावते, चिरकाळ स्मरणात राहते.

वऱ्हाडी बोलीतून शेतकऱ्यांचं दुःख सजीव करणारे विदर्भातील 'आमी शेतकऱ्याची पोरं' लिहिणारे कवी अनिल पाटील ह्यांची कविता तशी रोखठोक आहे.

'अरे बस झाल्या आता...

पानाफुलावरच्या शहरी मानसाईवर
बेतलेल्या कविता...।
दिसत कसा नाई तुमाले
ढोरावानी जिनं जगनारा मानूस
जिता जागता...' (आ.शं. पो. पृ. ४०)

अन्याय आणि अत्याचाराचे प्रभावी चित्रण करण्यात अनिल पाटील ह्यांचा हातखंडा आहे. त्यांच्याकवितेचा गौरव करताना पु. ल. देशपांडे आवर्जून भाषेलाच महत्त्व देतात. ही कविता मुख्यतः ऐकण्यासाठी आहे. तुमच्या संग्रहातील (आमी शेतकऱ्याची पोरं) प्रत्येक कवितेतून तुम्ही वऱ्हाडी बोलीमुळे वाचकाला श्रोता केले आहे. प्रमाण भाषेतली कविता पाहुण्यासारखी नीट नेटके कपडे घालून येते. सभ्यपणाने किंचित अलिप्तपणाने वावरते. बोली भाषेतली कविता कशी उराउरी भेटते. त्या भेटीत सहजपणा असतो. शिष्टाचाराची अपेक्षा नसते. 'ये हृदयीचे ते हृदयी घातले' अशी परिस्थिती असते. जे पोटात दाटले ते ओठात उमलले असा प्रकार असतो.' असा अभिप्राय देऊन प्रमाण मराठीने वऱ्हाडी बोली साहित्याला एक प्रकारची मान्यता दिली आहे, असे आपण समजूयात.

यादवकाळातील मराठी भाषेचे अवशेष वऱ्हाडी बोलीत आजही टिकून आहेत. ह्याचा प्रत्यय ह्या सर्व साहित्यातून येतो. बोलींना उपेक्षित मानण्यात येते. ह्याचा फटका वऱ्हाडी बोलीलाही बसला आहे.

'वऱ्हाडी बोलीचा शास्त्रीय आणि संशोधनात्मक अभ्यास १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात सुरू झाला होता व तो आजही चालूच आहे. पण ललित साहित्याच्या निर्मितीत जे वैभव वऱ्हाडी बोलीने यादवकाळात उपभोगले ते वैभव मात्र आज तिच्या वाट्याला आलेले नाही असेच म्हणावे लागते. असे डॉ. उषा देशमुख 'वऱ्हाडी साहित्य- परंपरा आणि प्रवाह' ह्या लेखात म्हणतात.

वऱ्हाडीची काही वैशिष्ट्ये लक्षात घेतली तर ती अतिशय सरल व नादमधुर असल्याचे जाणवते. वऱ्हाडीत 'ण'च्या जागी 'न' वापरतात. 'ओ' ऐवजी 'व' वापरतात. तसेच 'ला' विभक्ती प्रत्ययाऐवजी 'ले' वापरतात. 'ळ'च्या जागी 'य' वापरतात. सामान्य रुपाच्या 'हा' प्रत्ययाने अनेकवचने तयार केली जातात. स्त्रिया प्रथमपुरुषी क्रियापदच नेहमी वापरतात. बोलताना वऱ्हाडीत चालू वर्तमानकाळ आजही वापरात आहे. वऱ्हाडी साहित्यातही तो आहेच वऱ्हाडीत 'देजो' 'करजो' ही रुपे टिकून आहेत. ह्या बाबी जर लक्षात घेतल्या तर वऱ्हाडी सुगम वाटते.

वऱ्हाडी भाषा वऱ्हाडी जनजीवनाचे अविभाज्य रूप आहे. तसेच मराठीचेसुद्धा ! 'माणसाची संस्कृती त्याच्या भाषेत सामावलेली असते, असे म्हणतात. संस्कृतीच्या विकासावरोबर भाषेचा विकास होतो. समाजात आणि संस्कृतीत सारखे बदल होत असतात. लोकभाषा हे बदल स्वीकारत असतात. त्यामुळे कालांतराने भाषाही बदलते. आजची वऱ्हाडी भाषाही अशीच बदलली आहे. तरीही तिचे आद्य रूप बऱ्याच प्रमाणात शिल्लक आहे.' (वैदर्भीय पृ. २०)

वऱ्हाडी बोली वऱ्हाडी साहित्याचा आत्मा आहे. ह्या बोलीभाषेमुळेच ह्या साहित्याला जिवंतपणा लाभला आहे. प्रथम वाचन अवघड वाटले तरी हे साहित्य काळजाला हात घालते हे निश्चित. डॉ. विठ्ठल वाघांच्या

कविता त्यामुळेच मनाला भिडतात.

शहरी भागात राहून, वापरून सोयीप्रमाणे वऱ्हाडी लिहिणारे नवे नवे लेखक आपले लेखन घेऊन समोर येत आहेत. बोलीतील शब्दांचे शहरीकरण होणे आणि ते वापरात येणे टाळता येणार नाही.

*''भाकरीच्या पुळे । मानूसपन जये ।*

*जये त्याले कये । मोलं तिचं ॥'* (भुलाई, पृ. ५८)

यासारख्या मोजक्या शब्दातून विदर्भातील दैन्य दुःख ह्यांचे चित्रणही ह्या साहित्यातून होताना दिसते. वरील कडव्याला म्हणीचा तोंडवळा प्राप्त झाला आहे. लोकभाषेत ह्या म्हणी व वाक्प्रचारच जिवंतपणा आणतात.

'भाषेचे खरे, अस्सलरूप तिच्यातील म्हणी व वाक्प्रचारात आहे. त्यांची निर्मिती रोजच्या लोकव्यवहारात, लोकामुखी प्रत्यही होत असते. त्यात कमालीचा ताजेपणा, जिवंतपणा असतो. त्या ठायी तेवढीच अकृत्रिमता असते. सहजता-स्वाभाविकता असते. म्हणूनच गोडवा-माधुर्यही असते. आपल्या मनातील भाव-भावना साध्या, सरळ, सहज रीतीने व सोप्या, सुबोध शब्दांत लोकभाषेतून व्यक्त होत असतात. एखाद्या स्वच्छ-निर्मळ जलाशयात भोवतीच्या निसर्गाचे, आकाशाचे, अकृत्रिम प्रतिबिंब पडते, तसे संपूर्ण जनजीवन लोकबोलीतून अभिव्यक्त होत असते. असे डॉ. विठ्ठल वाघ म्हणतात. त्यामुळेच वऱ्हाडी साहित्यात वैदर्भीय जनजीवन संपूर्णपणे अभिव्यक्त झाले आहे.

वऱ्हाडी बोलीचे वैशिष्ट्य म्हणजे १९३० मध्येच तिच्या अभ्यासाची सुरुवात करण्यात आली होती. स्व. वा. ना. देशपांडे आणि स्व. प्र. रा. देशमुख ह्यांनी त्याकाळात वऱ्हाडीचा शास्त्रशुद्ध अभ्यास करण्याचे प्रयत्न सुरु केले होते. पण त्यानंतर त्या प्रयत्नात सातत्य राहिले नाही.

एकंदरीत आज वऱ्हाडी साहित्याचा जोमदार प्रवाह आपल्या जातीवंत शब्द भांडारासह मराठीच्या दरबारी रुजू झाला आहे, हे नक्की ! त्यामुळे मराठीची ताकद वाढीस लागली आहे.

**सारांश (लेखिकेचे निष्कर्ष)**

१) आज सर्व बोलींपेक्षा जास्तीत जास्त भूभागात बोलली जाणारी आणि जास्तीत जास्त लोक आपल्या दैनंदिन व्यवहारासाठी वापरत असलेली महत्त्वाची बोली ही वऱ्हाडी बोली हीच आहे.

२) विदर्भाची अनभिषिक्त सम्राज्ञी असणारी 'वऱ्हाडी बोली' ह्या साहित्यातून अगदी महानुभाव साहित्यापासून आत्मस्पर्शी आणि आत्मसाक्षात्कारी स्वरुपात प्रगटली आहे. हे ह्या साहित्याचे आगळे वैशिष्ट्य आहे.

३) वऱ्हाडी बोलीतील लेखनाची सुरुवात थेट रविकिरण मंडळाच्या काळात म्हणजे १९३० ला झालेली दिसून येते. तर पहिले पुस्तक १९३२ ला प्रकाशित झालेले दिसून येते.

४) वऱ्हाडी बोलीचा वापर साहित्यात १९३० पासून होत असल्यामुळे लोकभाषेच्या संरक्षणाचा मुद्दा वऱ्हाडीने घालून दिला. त्यापूर्वी यादवकालीन साहित्याने तो घातलेलाच होता.

५) यादवकाळातील मराठी भाषेचे अवशेष आजही वऱ्हाडी बोलीत टिकून आहेत.

६) वऱ्हाडी भाषा वऱ्हाडी जनजीवनाचे अविभाज्य





अनुक्रमणिका

रुप आहे. तसेच मराठीचेसुद्धा.

७) वऱ्हाडी बोली वऱ्हाडी साहित्याचा आत्मा आहे. ह्या बोलीभाषेमुळे ह्या साहित्याला जिवंतपणा लाभला आहे.
८) वऱ्हाडी बोली भाषा मराठीची साक्षात् जननी आहे.
९) वऱ्हाडी बोलीचे वैशिष्ट्य म्हणजे १९३० मध्येच तिच्या अभ्यासाची सुरुवात करण्यात आली होती. त्या काळात स्व. प्र. रा. देशमुख संस्कृत वऱ्हाडीपासून निर्माण झाल्याचे, तिचा शास्त्रशुद्ध अभ्यास करताना ठासून सांगत होते.
१०) आज वऱ्हाडीचा जोमदार प्रवाह (साहित्याच्या क्षेत्रात) आपल्या जातीवंत शब्दभांडारासह मराठीच्या दरबारी रुजू झाला आहे, हे नक्की.
११) बोलींना सन्मान दिला जाऊन तिच्या अभ्यासाला प्रोत्साहन देण्यात यावे. मराठीच्या भाषातज्ज्ञांनी बोलींच्या अभ्यासाला प्राधान्य, प्रोत्साहन व महत्त्व दिले पाहिजे.

**संदर्भ ग्रंथ**


१) ग्रामगीता - वं. तुकडोजी महाराज
२) बोबडे बोल - स्व. पां. श्री. गोरे
३) लव्हाळी - डॉ. वि. भि. कोलते
४) वऱ्हाडमाती - स्व. शरदचंद्र सिन्हा
५) सोटेशाही - स्व. देवीदास सोटे
६) साय - डॉ. विठ्ठल वाघ
७) वैदर्भी - डॉ. विठ्ठल वाघ
८) धुयमाती - मिर्झा रळी अहमद बेग
९) इरवा - कवी शंकर बडे
१०) भुलाई - डॉ..प्रतिमा इंगोले
११) आमी शेतकऱ्याची पोरं - कवी अनिल पाटील
१२) वैदर्भीय - डॉ. प्रतिमा इंगोले
१३) वऱ्हाडी लोकभाषा - डॉ. प्रतिमा इंगोले
१४) स्वातंत्र्योत्तर वऱ्हाडी साहित्य - डॉ. शोभा नाफडे
१५) ग्रामीण साहित्य लेखिकांची निर्मिती - डॉ. प्रतिमा इंगोले


**नियमकालिकातील संदर्भ**


१) वऱ्हाडी साहित्य-परंपरा आणि प्रवाह - डॉ. उषा मा. देशमुख, दै. लोकसत्ता, नागपूर
२) बोलीचा बोलबाला - डॉ. विठ्ठल वाघ, दै. सकाळ - १८/८/२००६
३) भुईच्या लेकीची भुलाई - मा. वामन तेलंग (ता. ४/५/९७), संपादक- तरुण भारत-प्रासंगिक


**अप्रकाशित लेख**


१) भाषावृद्धीत वऱ्हाडी बोलीचे अनुदान - अ. भा. बोली महामंडळाच्या वर्धापनदिनी वाचलेला निबंध ता. १९/९/२००६
२) वऱ्हाडी लोकभाषा आणि संस्कृत - भांडारकर प्राच्य-विद्या संशोधन मंदिराच्या (लोकभाषा आणि संस्कृत) चर्चासत्रात वाचलेला निबंध, ता. १९/४/२००५
३) वऱ्हाडी बोलीचा सामाजिक अनुबंध - उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
४) आजची वऱ्हाडी बोली स्वरुप आणि चिकित्सा - उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव





**डॉ. प्रतिमा इंगोले**
अ/३१/फुलोर, नारायणनगर, दर्यापूर,
जि. अमरावती-४४४८०३
फोन : ०७२२४/३४३१४, ९८५०११७९६९


## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला वाङ्मयसेवा पुरस्कार

उत्कृष्ट वाङ्मयीन नियतकालिक म्हणून महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र 'महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला' गौरविले आहे. गेली ४/५ वर्षे साहित्यपत्रिकेचे अंतर्बाह्य स्वरूप बदलले असून ती अभ्यासू वाचकाभिमुख झाली आहे. महाराष्ट्रातून त्याचे स्वागत झाले आहे.

नाशिक रोडच्या वाङ्मयसेवा प्रकाशन संस्थेकडून हा पुरस्कार मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचे गावसकर सभागृह दादर (पूर्व) टीटी येथे वाङ्मयसेवा महोत्सव अंतर्गत प्रदान करण्यात आला.

# मराठवाडी बोली

डॉ. केशव देशमुख

सामान्य व्यक्ती, तिचा समूह हेच मुळी कुठल्याही बोलींचे जनक आणि संवर्धक असतात. ग्रंथ हेच बोलींना संगोपित करू शकतात; उत्पन्न करू शकत नाहीत. व्यक्तींच्या वाचा ह्या बोलींना आविष्कृत तसेच विकसित करतात. व्यक्तीची प्रज्ञा ही बोलींना व्याप्ती व महत्त्व मिळवून देते. ज्या त्या प्रदेशांतील बोलणाऱ्या घटकांच्या मार्फत बोली तग धरून असतात. तात्पर्य, प्रदेशांचे ठसे व्यक्तिसमूहांच्या रक्तांत मिसळलेले आढळतात. ही अशी भाषिक अस्मिता ('बोलिक' अस्मिता म्हणूया) मग माणसे बोलण्यातून वा संवादविनिमयातून, तर लेखक- कवी सर्जक लेखनाविष्कारातून बोली जपतात. सांभाळतात. वाढवितात. टिकवितात. या अर्थाने संस्कारशीलतेची, परंपरेची रक्तवाहिनी म्हणूनही बोलींकडे पहाता येते. बोलींत बाह्य रंगभूषा गौण तर तिच्या लेखी अंतरंगभूषा मौलिक असते. प्रमाणित मानलेल्या भाषेपेक्षा बोलींची प्रभावक्षमता अर्थातच अव्वल राहणार. कारण बोलींच्या वंशकुळामागे एक व्याप्त परंपरेचा, जनसमूहाचा, प्रथासणांचा, साक्षात् जगण्याचाच मोठा वारसा असतो. त्यामुळेच मनाला भिडणे हे बोलीमार्फत विलक्षण प्रभावीपणे साधते. वास्तविक पहाता 'बोलीशास्त्राचे स्वरुप मूलतः भौगोलिक आहे''[१] असे नमूद करून बोलींच्या अभ्यासात प्रदेशातील बोली आणि बोलण्यातील प्रयोगाची उपयोगविविधता यांना मिलिंद मालशे यांनी दिलेले अधिक महत्त्व रास्तच आहे. कारण बोलीचिंतनातून भूगोल आणि बोलीची जनउपयोगिता वा वाचिक व्यवस्था दूर सारताच येत नाही. तर याहीपेक्षा बोलींचे समुचित महत्त्वमापन करताना ना. गो. कालेलकर यांनी ''भाषा अशी स्वतंत्रपणे नसतेच. खरे अस्तित्त्व असते ते बोलींनाच.''[२] असे सांगून बोलीची असणारी अनभिषिक्त महत्ता नोंदवूनच ठेवली असून ती यथार्थच होय.

एका विस्तारित अर्थाने बोली ह्या समाजभाषा होत. समाज मुका असत नाही. समाज भावनाशून्यही नसतो. वाचा, विकार, संस्कार आणि संस्कृती या चौपदरांमध्ये व्यक्ती, समाजाची प्रवासयात्रा अथांग सुरू असते. रेल्वेबोगींतून स्थानकपरत्वे जशी माणसं बोलतात. बोग्या बदलत नाहीत असेच व्यक्ती-बोलीचे अनुबंध आहेत. व्यक्ती येते, जाते. पिढीबदल होतो. तथापि, एका विशिष्ट प्रदेशातील बोली मुळाबरहुकुम बदलत नाही. फारच पुढे जाऊन गं. ब. ग्रामोपाध्ये यांनी बोलीचा ''मानववंशशास्त्रदृष्टयाही विचार''[३] केला पाहिजे असे स्पष्ट मत सांगून बोलींच्या उगमाची मूल्यगर्भता अधोरेखित केली आहे.

मराठवाडा हा प्रदेश सांस्कृतिकता, लढवय्येगिरी, सारस्वतीय संपन्नता, चळवळप्रवण, भाषिक उन्नतावस्था आणि शैक्षणिक प्रसरणशीलता या सर्व घटकांच्या दृष्टीने ऐतिहासिक व प्रतिष्ठामूलक प्रदेश आहे. मराठवाडी बोलीचे मराठी साहित्याला असलेले योगदान मोठे आहे. आद्यकवयित्री महदायिसा ही मूळची जालना या मराठवाड्यातील जिल्ह्याच्या रामसगावची आहे. एवढा एक आरंभसूचक हा दाखला मराठवाड्याची सर्जकता आणि सांस्कृतिकता सांगावयास पुरेसा ठरणारा होय. फार मागेही न जाता मराठी साहित्याला मराठवाडी बोलीचे यथार्थ योगदान तपासावयाचे असेल तर मराठीतले साठोत्तरी साहित्य अथवा सद्यकालात लिहिले जात असलेले सशक्त मराठी साहित्य- कथा, कविता, विनोद, कादंबरी, नाटक, आत्मकथन या विविध वाङ्मयप्रकारांतील मराठवाडी साहित्य हे मराठवाडी बोलीने डवरलेले, उजळलेले आहे; हे विपुल दाखल्यातून दाखविता येते. मराठवाडी बोलीचा लहेजा हा झणझणीत आणि अवीट ठसका लावेल असा आहे. शिव्या- इकडे प्रचंड मूल्यगर्भ आहेत. वृत्ती आणि व्यक्ती यांना वठणीवर आणायला शिव्या मायबापांप्रमाणे मदतीला धावून येतात असा हा मराठवाडा.

''काय सेमनं पहायलास का ?''
''तुझ्या मायीचा टन्ना !''
''ए, बुलिहुंग्या इकडं ये !''
''कोठं हिंडायलास बे कानकापल्या कुत्र्यावनी !''

अशी सहस्रावधी विधानं जनदळणवळणामध्ये मराठवाड्यात लीलया वापरली जातात. शिवीचे संज्ञापन मराठवाड्यामध्ये लळा, प्रेम, जिव्हाळा, रोष, वृत्ती या साऱ्यांना प्रकट करीत आलेला आहे. मराठी साहित्यातही याचे अस्सल परंतु अव्वल प्रतिबिंब उमटलेले दिसते.



अनुक्रमणिका

विशेषकरून मराठी ग्रामीण आणि दलित साहित्यात तर एक स्वतंत्र वैभवाचे क्षेत्र मराठी बोलीने जपून ठेवलेलेच आहे असे निदर्शनास येईल. याद्दष्टीने, रा. रं. बोराडे (लातूर, उस्मानाबाद), भास्कर चंदनशिव (बीड-भूम-परंडा), भ. मा. परसवाळे, फ. मुं. शिंदे (हिंगोली-औंढा-जिंतूर), रुस्तुम अचलखांब (जालना-मंठा-परतूर), इंद्रजित भालेराव, केशव सखाराम देशमुख, हरकळ (परभणी-जिंतूर), आसाराम लोमटे, भारत काळे (परभणी), रविचंद्र हडसनकर- दत्ता भागवत-जगदीश कदम (हदगांव, नांदेड), शेषराव मोहिते, विजय जावळे, जयराज खुणे (लातूर-बीड-उस्मानाबाद), लक्ष्मण गायकवाड (लातूर), ललिता गादगे, मधु सावंत (लातूर-नांदेड) : अशा संपन्न लेखकांची एक फळीच मराठवाड्यात बोलीला स्वीकारत आकाराला आली. कंसांतील शहरे आणि प्रदेश हे त्या त्या लेखकांच्या लेखनकृतींतून आविष्कृत झालेली बोली अर्थात, मराठवाडी बोली निर्देशित करतात. उपरोक्त लेखकांची सूची अजून व्यापक होणारी आहे. तथापि विस्तारभयास्तव विशेष लक्षणीय नावांचा उल्लेख केलेला आहे. 'माणूस' हा चिंतनाचा विषय 'गावकी' आत्मकथनात बोलीतून आला; त्या विचारातील झणझणीत प्रभाव मराठवाडी बोलीत पुढीलप्रमाणे जाणवेल. उदा. ''साळा न्हाई सिकलास तर ढोरं वलावी लागतील. सायवाची विगार डोस्क्यावर घेऊन ठाण्यावर गांडीतून गू निगुस्तोर उनातानातून पळावं लागंल.''[४] असा बोलीजन्य ठसका जालना-मानेगाव-मंठा-वाटूर या गावांना वेढून असणारा असून त्यातल्या तिखटपणाची धार लवंगी मिरचीसारखी धारदार, प्रभावी आहे.

''व्हय पर सुखदेवरावानं आबाराव शेळक्यांसंगं भांडन उकरून काढलं म्हणूनच तुला एव्हढा जोर चढलाय न्हवं का ?''[५] या विधानातून रा. रं. बोराड्यांनी 'चारापाणी' कादंबरीत मराठवाडी कृषक जनलोकांची बोली वापरून लातूरी उस्मानाबादी बोलीची कळा आणि प्रतिष्ठाच दृढमूल केली आहे हे ध्यानी येते. 'मरणकळा', 'अंगारमाती', 'जांभळढव्ह', 'विरडं' कथासंग्रह लिहून मराठी कथेला परिमाण तर मराठवाडी बोलीला प्रतिष्ठा देणाऱ्या चंदनशिवांनी भाषिकपातळीवरील जगण्याची धग, रग प्रकट केली आहे. 'अंगारमाती' कथासंग्रहातील हा संवाद पाहा :

''आरं, माझं पोतं रं ?''

''थ्योऽऽ त्याच्या आयला, कुठं टाकलं रं ?''

''आरं हितूनच उतरत व्हतो. पाय घसरला आन् पडलं.''

''... ससं उठलं आन कुत्रं हागाय बसलं...''

किंवा

''च्यायला, साऱ्या दुनयेचं तोंड खालतं, अन् सरकारचं तोंड वरतं; कसा मेळ बसायचा ?... सारा धंदाच उलटा न् पालटा हून बसलाय...''[६]

हा मराठवाडी भाषेचा गावरान दणका परिणामकारक प्रादेशिक बोलीचे तेज आणि अंतरंग समजून घ्यायला ठळक म्हणावा लागेल. लोकभाषा आणि बोलीचा वापर यातील लक्षणीय लज्जत दर्शविणारी सामर्थ्यशाली कविता मराठवाड्यातून लिहिली गेली. याद्दष्टीने, आम्ही कावाडाचे

धनी, पाढा, बळिवंत, हिरवे रान, मातरं, जिंदाबाद मुर्दाबाद, झाडमाती हे कवितासंग्रह मराठवाडी बोलीची संपन्नता दर्शवितात.

'आस्सी आस्सी हाय पोर
आस्से आस्से हे पाव्हने
आस्या आस्या हैता गोष्टी
आसे आसे तानेबाने'[७]

ह्या ओळींतून बोली भाषेतला अनुप्रास उच्चार लकब आणि देहबोली यांच्यातील ढंगरंग समजून द्यावयाला मदत करतात. किंवा मराठवाडी बोलीचा अजून यापेक्षा निराळा ढंग नमूद करणारी 'इडा पिडा टळो' कथासंग्रहातील ही वाक्यं पाहा :

१) 'नागनाथबी मातीच्या ढेकळासारखा आतून इरघळला.''
२) 'पुन्हा एकदा दुसऱ्या चिखलाच्या डेऱ्यात अडकायलोत.'
३) 'आपुन आसं मेटं मोडल्यावनी बुधवाड्यात कव्हरक झुरत वसावं.'
४) 'लेकरं चिमणीसारखी तोंड करून बसली असंर...'
५) 'निस्तं पोट फुटोस्तोर पानीच ढोसावा वाटतं.'[८]
६) 'पिण्याच्या पाण्यासटी बोरींगा मारल्या.'
७) 'आपल्याला सरपास करून डोहीजड कोन व्हईल?'
८) 'गडी जास्तच भारमसुद वाटू लगला.'
९) 'ते तं माझ्या म्होरंच आले केधुळचे.'
१०) 'घरात उंदरानं कुठतरी खांडात टर्र टर्र कोरायचा घाट घातला.'[९] ही 'भूमिया' कथासंग्रहात आलेली निरनिराळी वाक्यरचना बोली, व्यक्ती, वृत्ती, प्रदेश यांना ठसठशीत करतात आणि मराठवाडी बोलीचे लक्षणीय वेगळेपण दर्शवितात.

'गणगौळण' या विनोदी लेखनसंग्रहात बोली आणि व्यक्ती यांच्यातील नटखट प्रभावी संवाद तर मराठवाड्याच्या बोलींच्या बारीक गमतीजमती घट्टपणे धरून ठेवतात. याचदृष्टीने, सदानंद पुंडगे यांचे 'गँगमन' हे आत्मकथनही मराठवाडी बोलीचा जिवंत प्रत्यय देते.

मराठवाड्याची बोली, मराठी साहित्याच्या योगदानात प्राणवायुसारखी उपयुक्त तथापि अपरिहार्य म्हणून आली आहे. नवे कथालेखक, नवे कवी, नवे कादंबरीकार नवे रंगकर्मी मराठवाडी बोलींचा सर्रास, सहज, आढळाने उपयोग करतात; आणि प्रसृत केलेल्या प्रश्नांची झळ, वेदना अधिक सामर्थ्यांसह मांडतात. भ. मा. परसवाळे, यांची कविता, नागनाथ कोत्तापल्ले यांची दीर्घकथा-'राजधानी', शिंदे यांचे 'फकिराचे अभंग', योगीराज वाघमारे यांचे कथालेखन, सरदार जाधवांची कथा, केशव सखाराम देशमुखांची कविता, जयराज खुणे यांची कथा, हडसनकरांची गीतरचना, कविता, दत्ता भगत यांचे नाटक 'वाटापळवाटा', सावंतांची कादंबरी, बैजंलाचे कादंबरी लेखन, बावू बिरादारांची कादंबरी, बा. बा. कोटंबे यांचे लेखन, आधान्यांची कविता, मलगीरवारांची कविता, जगदीश कदम यांचे कथालेखन, उमेश मोहितेंची, गुंदेकरांची कथा : किती नावे ? किती पुस्तके? कितीतरी सशक्त कलाकृती मराठवाडी बोलींतून सिद्ध केल्या. या सर्व लेखकांचे मराठवाडी बोलीतील योगदान लक्षणीय आहे.

**संदर्भ-टीपा**


१. आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन : मिलिंद स. मालशे, लोकवाङ्मय गृह, मुंबई, १९९८.
२. भाषा आणि संस्कृती : ना. गो. कालेलकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९८२.
३. भाषा-विचार आणि मराठी भाषा : गं. ब. ग्रामोपाध्ये, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७९.
४. गावकी : रुस्तुम अचलखांब, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८३.
५. चारापाणी : रा. रं. बोराडे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, १९९०.
६. अंगारमाती : भास्कर चंदनशिव, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, १९९१.
७. आम्ही काबाडाचे धनी : इंद्रजित भालेराव, बी. रघुनाथ प्रकाशन, परभणी, १९९२.
८. इडा पिडा टळो : आसाराम लोमटे, देशमुख आणि कंपनी, पुणे, २००६.
९. भूमिया : प्रभाकर हरकळ, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, २०००.


❖❖❖


**डॉ. केशव देशमुख**
प्रपाठक, मराठी भाषा, वाङ्मय विभागप्रमुख,
दानकुंवर महाविद्यालय, जालना-४३१ २०३





अनुक्रमणिका

# गोंधळी समाजाची 'पारुषी' भाषा

रेणुकादास उबाळे

भाषेचा अभ्यास करताना तिचा सामाजिक संदर्भ लक्षात घ्यायला हवा. यादृष्टीने महाराष्ट्रातील भटक्या-विमुक्त जाती-जमातींचे (विशेषतः भ. जा. 'अ'. आणि भ.ज.'ब'.) भाषिक भांडार व भाषिक वर्तन विलक्षण आहे. मुळात या समाजाला स्वतःचा गाव नाही. ना स्वतःची शेतजमीन. जगण्याच्या किमान गरजा भागवण्यासही त्यांना अवकाश नाही. विषमताधिष्ठीत समाजात अस्तित्त्वाच्या संघर्षासाठी गोंधळी, पोतराज, पारधी, भुते, नंदीवाले, डवरी गोसावी, पांगुळ आदी जाती 'भटक्या भिकारी जमाती'[१] बनल्या. सामाजिक विषमतेतून या समाजात परकेपणाची (सामुहिक परात्मतेची) भावना टोकाला गेली. असुरक्षिततेच्या या भावनेतूनच 'पारुषी' सारख्या सांकेतिक भाषेचा जन्म झाला.

एकंदर सर्वच भटक्या जातींमध्ये विशिष्ट सांकेतिक भाषा बोलली जाते. अर्थातच प्रत्येक जातीतील ही भाषा स्वतंत्र अशी असते. काही जातीत तिला 'पारुषी' असे म्हणतात. तसेच 'राजपूत भामटा' जातीचे लोक तिला 'डागुरी' तर मांग जातीतील लोक तिला 'अंबुजी' असेही म्हणतात.

१९व्या शतकात 'सोस्यूर' या स्वीस भाषा वैज्ञानिकाने जगातील सर्व भाषावैज्ञानिकांचे लक्ष भाषेच्या ऐतिहासिकतेकडून एककालिक अभ्यासाकडे तिच्या वैविध्यानुसार वेधले. 'जिवंत भाषा ही कधीच एकरूप नसते'[२] असे आपण मानतो. त्यामुळे तिला एकसंध मानून तिच्यातील वैविध्याचा व परिवर्तनाचा अभ्यास आवश्यक असतो. या विशिष्ट हेतूनेच सामाजिक भाषाविज्ञानाचा उदय झाला.

व्यक्तीच्या भाषिक वर्तनावर समाजाचा मोठा प्रभाव असतो. म्हणून सामाजिक घटकांचा भाषेवर परिणाम पडतो; तर भाषेवरून समाजाच्या संस्कृतीचे दर्शन होते. सामाजिक भाषाविज्ञानाची सुरुवात जरी सोस्यूरने केली असली, तरी त्यानंतर भाषिक क्षमतेची संकल्पना मांडून चॉम्स्कीने, त्याचबरोबर ब्लूम फील्ड, मॅलिनोव्हस्की, फोर्थ, सपीर आणि व्होर्फ इत्यादी अनेक भाषाभ्यासकांनी सामाजिक भाषाविज्ञानात मोलाची तात्त्विक आणि संशोधनात्मक भर टाकली.

'श्मिट' आणि 'रोर', या भाषावैज्ञानिकांनी सामाजिक भाषाविज्ञानात 'लघुक्षेत्र' ही संकल्पना मांडली. प्रत्येक व्यक्ती समाजात संवाद साधत असताना स्वतःच्या 'भाषिक भांडारानुसार' व सर्व सामाजिक परिस्थितीचे भान ठेवून बोलत असतो. त्याची भाषा ही सामाजिक गटानुसार बदलत असते. थोडक्यात, समाजात भाषा वापरायचे काही गट विविध क्षेत्राशी संबंधित असतात. भाषा वापराच्या ह्या क्षेत्रांना 'लघुक्षेत्र' असे म्हणतात. म्हणजेच सर्व भाषांना लागू पडेल असा लघुक्षेत्रांचा संच नसतो. महाराष्ट्रातील भटक्या विमुक्त जाती-जमातींमध्ये आजही विशिष्ट अशा बोलीभाषा बोलल्या जातात. या भाषांचा अभ्यासही एका वैशिष्ट्यपूर्ण लघुक्षेत्राचा अभ्यास ठरू शकतो. यांतील गोंधळी समाजातील भाषेचा आपण सविस्तर विचार करू.

**सांकेतिक स्वरूप :**

अभिव्यक्तीच्या दृष्टीने भटक्यांमधील सर्व पारुषी भाषा सारख्या वाटत असल्या तरी त्यांच्या स्वरुपामध्ये विविधता आढळते. या सांकेतिक भाषा विविध जातींतील सांस्कृतिक भिन्नता दर्शवितात. म्हणूनच 'गुपर्झ' या समाजशास्त्रज्ञाने पारुषीला 'समाजगटांच्या सीमांचे रक्षण करणाऱ्या भिंती'[३] असे म्हटले आहे.

गोंधळी समाजातील लोक एकत्र आल्यावर आपापसात काही महत्त्वाचे संवाद साधण्यासाठी किंवा इतरांना तो भाषिक व्यवहार कळू नये म्हणून प्रमाणभाषेपेक्षा वेगळे असे सांकेतिक शब्द वापरून बोलतात. विशेषतः हे शब्द मेहेत्रे (जातीचे पंच) योजतात. ते शब्द समाजातील सर्वांना मान्य असतात. (या भाषेचेस्वरुप प्रमाणभाषेशी काही स्वरुपात संमिश्र असते, हे येथे नमूद करावे लागेल. म्हणजे काही सांकेतिक शब्द व मराठी वाक्य रचना असे हे स्वरूप असते.) या भाषिक निर्मितीमागे अनेक प्रयोजने असल्याचे आढळते. सर्वसाधारणपणे 'गोंधळ' या विधीतील कलासादरीकरणातून हा उगम जाणवतो. काही जागी हे लोक 'भविष्यकथन' करतात. त्यामुळे एक



अनुक्रमणिका

व्यक्ती भविष्य सांगताना इतर दोघे बाजूला बसून या भाषेतून पुढील माहिती पुरवीत असतात. त्याला 'टोर काढणे' असे म्हणतात. ''ताक दूध दोन्ही बरोबर दोन घरी राहणार, दोन लोकांच्या घरी जाणार.''[४] अशा सांकेतिक भाषेत ते बोलतात. (याचा अर्थ दोन मुले, दोन मुली) या भाषेतील शब्द मुख्यत्त्वे जातपंचायत व सांस्कृतिक क्षेत्रांत जास्त वापरले जातात. त्यामुळे 'संस्कृतीजतनाच्या' उद्देशाने ही भाषा उदयास आली असावी असेही म्हणता येते.

भाषिक प्रयोजनाच्या दृष्टीने पाहता, ''साऱ्याच भटक्या जमाती पूर्व-दर्शनी कोणतातरी व्यवसाय करीत असल्या तरी 'चोरी', हाच त्यांचा मुख्य धंदा असतो व त्यासाठी त्यांनी पारुषी भाषा निर्मिती''[५] असे त्र्यं. ना. आत्रेंचे एकांगी मत असले तरीही ''गोंधळी जातीतील सांकेतिक भाषेचा वापर चोरीसाठी झाला असे ऐकिवात नाही.''[६] हे प्रभाकर मांडे यांचे मत लक्षात घेण्याजोगे आहे. थोडक्यात, 'कला प्रदर्शन' (उदा. करपल्लवी)[७], 'गुहाव्यवहार', 'समाजाविषयी परकेपणाची भावना', 'असुरक्षितता', 'परजातीयांना ओळखण्यासाठी' या



भाषेची निर्मिती झाली असावी.

**प्रमाण मराठीशी नाते-**

डी. एन. स्लीमन यांनी प्रथमतः या गुप्तभाषेचा शब्दसंग्रह १९३६ साली काढला. तोपर्यंत याभाषेचे स्वरूप फक्त मौखिकच होते.प्रमाण मराठी भाषेशी या सांकेतिक शब्दांचा काही अंशी कार्यकारणभाव आढळतो. उदा. :

| प्रमाण मराठी | गोंधळ्यांची पारुषी |
|---|---|
| १. बोल = | चोल (अकारान्त) |
| २. नवरा = | नरगा (आकारान्त) |
| ३. पाणी = | चिवानी (ईकारान्त) |
| ४. ब्राह्मण = | खामण (अकारान्त) |
| ५. निघ = | निबळ (अकारान्त) |

असे साधर्म्य आढळले तरी ते काही अंशीच असते. सर्वसामान्य त्रयस्थ व्यक्ती याप्रकारे या भाषेचा अर्थ काढू शकत नाही. आणखी एक मुद्दा असा की, या भाषेवर इतर भाषांचा प्रभावही दाखवता येतो. जसे- गोंधळातील 'उदो-उदो' हा शब्द 'उदवू' या तमिळ शब्दापासून (अर्थात् वाचव संबंधित उदो-उदो या शब्दाचा वापर मराठीत लाक्षणिक अर्थाने होतो.) आला आहे असे विश्वनाथ खैरेंचे सांगणे आहे.''[८]

काही उदाहरणे-

**अ. विधिविषमक शब्द**

१. खडती = संकट टळावे म्हणून लोक गोंधळ्यांकडून बंधन करून घेतात. त्यास 'खडती' म्हणतात.
२. संबळ = गोंधळातील चर्मवाद्य.
३. चोंडकं = तुणतुणं
४. भांबा = डमरूसारखे एक वाद्य.
५. टाक = देवांचे मुखवटे
६. दिवटी = गोंधळातील मशालीसारखा टेंभा
७. गादी = पुजेच्या वेळी मांडलेली ध्यानरचना
८. मारग मळणे = गोंधळाच्या आधी हनुमान मंदिरात जाऊन येण्याचा विधी.
९. भेरे करणे = भिक्षेसाठी फिरणे
१०. व्हनार = भविष्य सांगणे.

**ब. जातीविषयक शब्द**

१. खामण = ब्राह्मण
२. कुगाड = महार

३. चिंगडे = मुसलमान

**क. आहारविषयक शब्द**

१. टापी = भाकरी
२. कोलड्यास = भाजी
३. रेणगी = मांस (मटण)

**ड. दैनंदिन व्यवहारातील इतर शब्द**

| | |
|---|---|
| १. झुंगर- माणूस | २. कनशीन - बाई |
| ३. पानकं - मूल | ४. केमडी - चोरी |
| ५. नाट - घर | ६. गाजणे - जेवणे |
| ७. खंटणे - रडणे | ८. निवळणे - जाणे |
| ९. तेगणे - देणे | १०. तुळे - पैसे |
| ११. चिवणे - भिणे | १२. खेड - भूत |
| १३. रिसाडी - लुगडं | १४. नंगल्या - घेकडा |
| १५. गवऱ्या - पाय | १६. खोबांड - तोंड |
| १७. इरचीक - नाक | १८. कवची - भांडी |
| १९. खावडी - अंडी | २०. घटाळ्या - तांव्या |
| २१. नेमानं - बकरी | २२. लेकणं - खाणं |
| २३. टिकते - दिसते | २४. गासकणं - येणे |
| २५. पकडी - कोंबडी | २६. बकान्या - घोडा |
| २७. खुरपूस - घोरपड | २८. साशी - चांगले |
| २९. सोवांडी - म्हैस | ३०. शिकारी - शिवी |
| ३१. चिवानी - पाणी | ३२. कुडपीव - पाज |
| ३३. फतऱ्या - नारळ | ३४. बोकावं - फोड |
| ३५. बेंद्या - देव | ३६. लुगलं - वारले |
| ३७. सनली - दिली | ३८. झुकलं - कुत्रं |
| ३९. कटावलं - चावलं | ४०. खुकान् - जाऊ |
| ४१. नटी - नको | ४२. ठाल्लीय - आहे |

**काही वाक्ये-**

अर्थात

१. टापी लेकली का ? - भाकर खाल्ली का ?
२. त्याने पकडी गासकवली - त्याने कोंबडी आणली.
३. बकान्याला चिवानी कुडपीव - घोड्याला पाणी पाज.
४. बेद्याला फतऱ्या बोकावं - देवाला नारळ फोड.
५. नरग्याने शिकारी सनली - नवऱ्याने शिवी दिली.
६. ती गासकणारी नरगी टिकते - ती येणारी बाई दिसते.

**प्रादेशिक बोलीचा प्रभाव**

गोंधळी समाजात हीच भाषा (किंवा हेच शब्द) सर्वत्र सारखे आढळत नाहीत तर तिचे विविध प्रादेशिक स्तर पडतात. प्रादेशिक बोलींचा प्रभावही पारुषीवर पडत असतो. जसे 'गाजणं' या धातूला 'गाजायला' असा प्रत्यय लागतो. मात्र विदर्भात त्याचे रूप 'गाजायले' असे होते. किंवा काही शब्दांचा वावर विशिष्ट भागात जाणवतो. 'रंवगी', 'चिवण', 'तुळे' हे विशिष्ट शब्द मराठवाड्यात तर वक्कळ, मोप इ. शब्द लातूर, उस्मानाबाद परिसरात आढळतात.

गोंधळी समाजातील भाषेचे काही शब्द आणि भटक्या विमुक्त इतर जातीतील सांकेतिक भाषेचे काही शब्द यामध्येही साधर्म्य-वैधर्म्य असल्याने त्यांचा तौलनिक अभ्यासही शक्य आहे. बऱ्याच जागी या भाषांमध्ये भिन्नता आढळते. जसे 'टापी लेकली का ?' या गोंधळी पारुषीचे रुप 'करपुटी खुतली का ?' असे मांग

समाजातील भाषेत होते. तरी या दोन्ही वाक्यांचा मराठीत अर्थ 'भाकर खाल्ली का ?' असाच आहे.

परंतु बऱ्याचदा या भिन्न जातीतील बोलींमध्ये काही अंशी कार्यकारणभाव जाणवतो. उदा. -

१. केमडी (गोंधळी) = खाबडी (मेंढगी) = खाबी (मांग)
२. चोल (गोंधळी) = चोळवाड (मेंढगी) =
३. रेवंगी (गोंधळी) = रेवाटं (मेंढगी) = रेवाटी (गोपाळ)
४. निबळ (गोंधळी) = निझर (मेंढगी) = निझर (गोपाळ)
५. कुगाड (गोंधळी) = कुगाड (मेंढगी) = झुगाडी (गोपाळ)
६. चिंगडे (गोंधळी) = चिंगड्या (मेंढगी) = झुमानी (गोपाळ)

वरील शब्दांचे मराठीत अनुक्रमे १) चोरी, २) बोल, ३) मांस, ४) निघ, ५) महार, ६) मुस्लीम असे होतात. थोडक्यात गोंधळ्यांच्या पारुषीचे इतर जातीतील बोलींशी साम्यभेद आढळतात. प्रत्येक बोलीभाषेला व्याकरण हे असतेच. पारुषी भाषेच्या विनियोगाच्या वेळी तिला लागू होणारे व्याकरणिक नियमही मराठी प्रमाण भाषेप्रमाणे आहेत. तसेच या भाषेवर प्रादेशिक प्रभावही असल्याने त्यातील ग्राम्यताही लक्षणीय आहे.

पारुषी भाषेची निर्मितीच ही प्रमाणभाषेपासून वाटलेल्या परकेपणाच्या भावनेतून झाली आहे. म्हणून पारुषी बोलणाऱ्यांना सर्वसाधारणपणे प्रमाणभाषा प्रिय नव्हती. ते त्यात पारंगत नव्हते, असे म्हणता येईल. समाजाचा पारुषी भाषेकडे बघण्याचा दृष्टीकोन कुतुहलाचा जरी असला तरी आदराचा मात्र नव्हता. ही भाषा चोरीसारख्या दुष्कृत्यासाठी वापरली जाते असाच गैरसमज पसरविण्यात आल्याचे दिसते. आजतागायत त्र्यं. ना. अत्रे, रां. चिं. ढेरे आणि तत्सम संशोधकांनी भटक्या विमुक्तांच्या हालाखीच्या सामाजिक परिस्थितीचे, त्यांच्या दयनीय अवस्थेचे, पोटासाठी अनिवार्यतेतून होत असलेल्या कलाप्रदर्शनाचे 'लोक संस्कृतीचे उपासक' या गोंडस नावाचा मुलामा देऊन त्यांच्या भटकेपणाचे उदात्तीकरण केले. परंतु आता मात्र, डॉ. नारायण भोसले, डॉ. विश्वनाथ शिंदे, उत्तम कांबळे आदी अभ्यासकांच्या सांस्कृतिक अभ्यासाला सामाजिक जाणिवेचा स्पर्श दिसतो आहे, ही बाब निश्चितच स्वागतार्ह आहे. भाषेचा अभ्यास हे देखील सामाजिक, सांस्कृतिक अभ्यासाचे अंग आहे.

भटक्या विमुक्तांतील बोलीभाषेचा अभ्यास करणे, हे समाजभाषाविज्ञानाच्या दृष्टीकोनातून जसे आवश्यक आहे, तसेच लोकसाहित्याच्या दृष्टीनेही गरजेचे आहे.

भाषेचा सूक्ष्म पद्धतीने अभ्यास करण्यासाठी पारुषीसारख्या बोलींचा अभ्यास निकडीचा ठरतो. हा अभ्यास योग्य दिशेने झाल्यास मराठी भाषेचे दालन, वैविध्यपूर्ण, सुंदर व समृद्ध होईल असे वाटते.

**संदर्भ व टीपा-**


१. पहा. डॉ. भोसले नारायण - भिकारी भटक्या जमाती 'मिळून साऱ्याजणी', दिवाळी २००७.
२. जोशी प्रभाकर, गोखले चारूता - सामाजिक भाषाविज्ञान, पृ. क्र. ३
३. मांडे प्रभाकर - सांकेतिक आणि गुप्त भाषा (परंपरा व स्वरूप) - पृ. ७०
४. शिंदे विश्वनाथ - शाहिरी वाङ्मयाच्या धारा - पृ. ११५
५. आत्रे त्र्यं. ना. - गावगाडा, पृ. ८१
६. मांडे प्रभाकर, उ. ति. पृ. ६९
७. करपल्लवी - गोंधळी समाजात कलासादरीकरणात केवळ हातवाऱ्यांद्वारे संप्रेषण चालविले जाते. त्यास 'करपल्लवी' किंवा 'सखित भाषा' म्हणतात. उदा. हाताच्या अनामिकेने अर्धे बोट करून इशारा केल्यास 'र' समजावा. किंवा नखाकडे संकेत केल्यास 'न' समजावा इ.
८. खैरे विश्वनाथ - अडगुलं मडगुलं, पृ. क्र.९०


❖❖❖


**रेणुकादास का. उबाळे**

साईनगर, किनवट, जि. नांदेड, भ्र. : ९४२३२१७७३८.

# अहिराणी बोली : इतिहास, भूगोल व समाज

डॉ. रमेश सूर्यवंशी

**खानदेशी प्रास्ताविक :** अहिराणी ही खानदेश या प्रदेशात बोलली जाणारी बोली. महाराष्ट्रातील धुळे आणि जळगाव या दोन जिल्ह्यांच्या मिळून होणाऱ्या प्रदेशास आजही खानदेश म्हणून ओळखतात. पूर्वी खानदेश हा मुंबई इलाख्याचा एक जिल्हा होता. प्राचीन काळी खानदेशचा विस्तार सातपुडा पर्वतापासून दक्षिणेकडे सातमाळा व अजिंठ्याचे डोंगर येथपर्यंत तर पूर्वेकडील वऱ्हाड प्रांत ते निमाड जिल्ह्यापासून पश्चिमेकडे वडोदे संस्थान व रेवाकाठ जहागिरीपर्यंत इतका होता. याचे अतिप्राचीन नाव ऋषिकदेश. यादवांच्या काळात हा भूभाग 'सेउनदेश' म्हणून ओळखला जाई. मोगलांच्या कारकीर्दीत हा भाग खानदेश म्हणून ओळखला जाई. व्यवस्थापनाच्या दृष्टीने इ.स. १९०६ मध्ये या खानदेश जिल्ह्याचे पूर्व खानदेश व पश्चिम खानदेश हे दोन भाग पाडण्यात आले. पुढे १९६० पासून पूर्व खानदेशास जळगाव जिल्हा व पश्चिम खानदेशास धुळे जिल्हा अशी नावे देण्यात आली.

**खानदेशचा इतिहास :** रामायण-महाभारत यांतील उल्लेखलेल्या ऋषकदेशाच्या वर्णनाशी खानदेशाचा भूभाग जुळतो. खानदेश या शब्दाची उत्पत्ती कान्हदेव, कान्हेरदेव, कान्हा देश, कानबाई या शब्दांत शोधण्याचा आजवर प्रयत्न झालेला आहे. मात्र त्यात तथ्य वाटत नाही. खानदेश या भूप्रदेशाहून इतरत्र कान्ह्याचा किंवा श्रीकृष्णाचा संबंध अधिकचा आहे. तसेच खानदेशातील अनेक उत्सवांपैकी कानबाई, कानुबाई हा एक उत्सव आहे. त्यामुळे एखाद्या भूप्रदेशाला त्या परिसरातील एका उत्सवाच्या नावाने ओळखले जाणे ही शक्यताही कमीच आहे. कान किंवा कानन म्हणजे अरण्य, वन, गवताळ प्रदेश. कान किंवा खान या शब्दाचा अर्थ खाण, खदान, थाळा, मध्ये खोल असणारा भाग, खनि किंवा उत्पत्तीस्थान. सातपुडाच्या रांगा, सह्याद्रीच्या रांगा, चांदवडचे डोंगर, आणि वाघूर नदी व परिसरातील डोंगर रांगा यामुळे हा परिसर खोल खदाणी सारखा, खाणीसारखा आहेच. गिरणा, तापी, नर्मदा या नद्यांच्या खोऱ्यांचा हा भाग दाट अरण्याचा, गुरांसाठी विपुल गवत असणारा प्रदेश. येथे विपुलता (खाण) होती, चौफेरून नैसर्गिक तटबंदीमुळे (भेसळमुक्त अशी) शुद्धता, वंश (खान) होता. असल्या व्युत्पत्तींचाही विचार करण्याजोगा आहे.

अशिरगड हे अश्वत्थाम्याचे स्थान होते. तर पांडवाविरूद्ध तोरणमाळचा राजा लढला होता ते तोरणमाळ धुळे जिल्ह्यात आहे, असे महाभारतकालीन उल्लेख आढळतात. चाळीसगाव जवळील पाटणे परिसरात आद्य पराश्मयुग व तदनंतर अप्पर पराश्म युगात मानवी वस्ती होती हे उत्खननात सापडलेल्या पाच स्थरांवरून सिद्ध होते. बहाळ येथे सापडलेली नाणी, घटोत्कच्छ लेण्या, नागद, मूंदखेडे, मेहुणबारे, वहुलवाड येथे सापडलेले ताम्रपट, सारजादेवी मंदिरावरील शिलालेख, अजिंठालेण्या इ. पुराव्याआधारे खानदेशाच्या इतिहासावर प्रकाश पडतो. खानदेशात इ.स. पूर्व चौथे व इ.स. दुसरे शतकात मौर्यांचे राज्य होते. पहिल्या शतकात सातवाहनांची सत्ता होती. ३ऱ्या ते ५व्या शतकांत वाकाटकांची सत्ता होती. (वर्षदेव, स्वामीदास, मुलंदा) चौथ्या शतकांत वाकांटकांसोबतच अभीरांचीही सत्ता होती. इ.स. ६५५ ते ७०२ या काळात सेंद्रकांचे (निंकुम्माल्लशक्ती, नृपती जयशक्ती, नृपती वैरसेन) राज्य होते. या सोबतच सहाव्या शतकांत कलचुरी तर सातव्या शतकांत पुलकेशींचे तर आठव्या शतकांत त्रैकूटकांचे राज्य होते. त्या नंतर नवव्या ते बाराव्या शतकापर्यंत राष्ट्रकूट सोमवंशी, आणि यादव यांचे राज्य होते. पुढे अल्लाउद्दीन खिलजी, अकबर, यांच्या सत्तेनंतर १८व्या शतकांत (इ.स. १७२०) निझामांचे राज्य होते. १७६० ते १८१८ हा मराठ्यांचा काळ तर १८१८ ते १९४७ हा ब्रिटिशांचा काळ गणला जातो.

**अहीर-अहिराणी :** रामायण महाभारत, मत्स्यपुराण, बृहत्संहिता, नासिक लेणे, महाराष्ट्र ज्ञानकोश, डब्ल्यू कूक यांचा कास्ट ॲण्ड ट्राइब्ज् इन नॉर्थ वेस्टर्न इंडिया, आ. इ. एन्थोव्हेन यांचे ट्राइब्ज ॲण्ड कास्ट ऑफ बॉम्बे

इ. ग्रंथांवरून अहिरांच्या इतिहासावर प्रकाश पडतो. त्या नुसार खानदेश हा मूळचा अहिरांचा देश. अहिरही शेतकऱ्यांची, गवळ्यांची एक जात. प्रमुख उद्योग गुरे राखणे. मत्स्यपुराणात सात तर वायू पुराणात दहा अशी अहीर राज्यांची संख्या दिसते. इ.स. १५० आंध्रांचा ऱ्हास होऊन आभीरांचे राज्य आले. वायव्येकडून दक्षिणेकडे सरकत आले. चौथ्या शतकांत खानदेशावर अहिरांचे राज्य होते. आठव्या शतकांत काठी लोक जेव्हा गुजराथेत आले; तेव्हा बराच मुलुख हा अहिरांच्या ताब्यात होता.

या अहिरांची वाणी-बोली. ती अहिरवाणी किंवा अहिराणी. खानदेशात अहिराणी ही कृषिजीवन जगणाऱ्यांची वोली आहे. खानदेश या जिल्ह्याच्या भूप्रदेशात ती बोलली जाते; म्हणून ती खानदेशी. आता खानदेश जिल्हाही जळगाव व धुळे या जिल्ह्यात विभागला आहे. मात्र या वोलीचे क्षेत्र या जिल्ह्याच्या क्षेत्राहून हे मोठे आहे. चांदवडचे डोंगर, सातपुड्याचे डोंगर, वाघुर नदी आणि सहापर्वत, अजिंठ्याचे डोंगर या निसर्गाने तोडून वेगळ्या ठेवलेल्या खोलगट भूभागात, खदानीत, खानीत ही खानदेशी, अहिराणी बोलली जाते. या भूभागात मग नासिक, नंदुरबार, औरंगाबाद, जळगाव, धुळे या जिल्ह्यांच्या गावाचाही समावेश होतो.

खानदेशात अहिर होते. कालानुरूप त्यांच्या नावांत बदल झाला. मात्र त्यांची अहिराणी, अभिरोक्ती किंवा अभिरी आजही टिकून आहे. अहिराणी बोली बोलणारे अहिर हे पंजाब मार्गे सिंध, राजस्थान, गुजरात, माळवा, नासिक असे होऊन खानदेशात स्थिरावलेत. त्यामुळे भटकंती दरम्यान त्यांच्या बोलीवर गुजराती, राजस्थानी, मराठी, हिंदुस्थानी, नेमाडी या अन्य भाषांचा प्रभाव पडणे साहजिकच होते.

**अहिराणी आणि खानदेशी :** खानदेशात अहिरांचे वास्तव्य होते. अहिरांनी सुपीक जमिनीवर गुरे चारण्यासोबतच शेती व्यवसाय सुरू केला. शेती व्यवसायाला पूरक असे विविध व्यवसाय करणारे इतर लोक अहिरांशी सततच्या संपर्कात येऊ लागले. सत्ता, व्यापार, व्यवसाय यातील अहिरांच्या भाषेचे वर्चस्व हे खानदेशभर वाढल्याने अहिराणी ही प्रदेशाच्या नावाने म्हणजे 'खानदेशी बोली' या नावाने ओळखली जाऊ लागली. ती एका जातीची भाषा न राहता ती त्या प्रदेशात राहणाऱ्या लोकांची, प्रदेशाची भाषा झाली. अहिरांशी सततचा इतर भाषिकांचा संपर्क हा त्यांच्या स्वतःच्या बोलीची छाप असणारी अहिराणी, मिश्र अहिराणी बोलू लागला. ती त्या प्रदेशाची, खानदेशाची बोली, खानदेशी म्हणून गणली गेली. खानदेशी बोली ही संकल्पना अहिराणी बोली ह्या संकल्पनेपेक्षा विशाल आहे. त्या त्या परिसरातील खानदेशी ही त्या त्या परिसराच्या नावाने संबोधली जाऊ लागली. ज्या जमातींनी ती भाषा स्वीकारली त्या त्या जमातीच्या नावाने ती बोली ओळखली जाऊ लागली. यानुसार खानदेशी बोलीचे सामाजिक आणि प्रादेशिक असे प्रभेद निर्माण झालेत. खानदेशीच्या प्रादेशिक प्रभेदांचा विचार करता, खानदेशाच्या नैर्ऋत्येकडील बागलान भागातील ती बागलाणी, उत्तरेकडील तापीच्या परिसरातील ती तप्तांगी, दक्षिणेकडील ती दखनी किंवा डोंगरांगी, पश्चिमेकडील

ती वरल्हांगी, पूर्वेकडील ती खाल्ल्यांगी, नेमाड कडील ती नेमाडी, डांगान परिसरातील ती डांगी, तसेच तावडी असे प्रादेशिक प्रभेद आढळतात. तर सामाजिक प्रभेदात, खानदेशात वास्तव्यास असणाऱ्या प्रत्येक जातीच्या स्वतःच्या बोलीची छाप असलेली अहिराणी बोली ही त्या जातीची स्वतंत्र नामधारण करून सामाजिक प्रभेदाचे रूप बनली. त्यात महारांची ती महाराउ, लाडशाखीय वाण्यांची ती लाडसिक्की, भिल्लाची ती भिलाउ, अहिरांची ती अहिराणी, लेवा पाटीदारांची ती लेवा पाटीदार बोली, पावरांची ती पावरी, काटोनी भिल्लांची ती काटोनी, घाटावरून आलेल्यांची स्वतःच्या बोलीची छाप असलेली ती घाटोयी, गुजरांची ती गुजरी, भावसारांची ती भावसारी, परदेशांची ती परदेशी अशा जाती निहाय अहिराणीच्या सामाजिक प्रभेदांची यादी वाढतच गेली. मग या सर्व सामाजिक आणि प्रादेशिक प्रभेदांना एकाच नावाने सामावून घेणारी विशाल संकल्पना ही ''खानदेशी बोली'' जी संपूर्ण खानदेशात बोलली जाते.

खानदेशात जनमानसात खानदेशी आणि अहिराणी ह्या दोन स्वतंत्र संकल्पना कधीही नव्हत्या. खानदेशी व अहिराणी हे दोन शब्द अर्थ भेदक कधीही ठरले नाहीत. अहिराणी ही खानदेशाची मध्यवर्ती बोली. तिच्या प्रभावाने आजूबाजूच्या प्रदेशातील बोली ह्या त्या प्रदेशाच्या नावाने (प्रादेशिक प्रभेद वागलाणी, घाटोयी, तप्तयांगी, खालल्यांगी, वरल्हांगी, डोंगरांगी, डांगी, जामनेरी इ.) तर जाती, जातीच्या बोली ह्या जाती वा समाजाच्या नावाने (सामाजिक प्रभेद महाराउ, गुजरी, परदेशी, भिलाउ, लेवा पाटीदार, तउवी इ.) ओळखल्या जाऊ लागल्या. मात्र आजही संपूर्ण खानदेशात जनसामान्यात व्यवहार करताना प्रत्येकजण अहिराणी (खानदेशी) बोलत असला तरी कागदोपत्री, जनगणणेचेवेळी वा कुठलाही फॉर्म भरताना मातृभाषा या रकान्यात ''मराठी'' हीच मातृभाषा नोंदविती. आपल्या बोली विषयी अनास्था, लाज वा ग्राम्यतेचे लक्षण मानणे ह्या बाबींमुळे सरकार दरबारी अहिराणी किंवा खानदेशी बोली बोलणारांची (प्रत्यक्षात सत्तर ते ऐंशी लाख लोक खानदेशातील लोकसंख्या- बोलत असतानाही) खरी संख्या कागदोपत्री आजवरही आलेली नाही. त्यामुळे अहिराणी बोली वा खानदेशी बोली असा स्वतंत्र दर्जा देण्याचा प्रश्नही कधी उद्भवला नाही.

❖❖❖


**डॉ. रमेश सूर्यवंशी**
'अभ्यासिका', वाणी मंगल कार्यालयासमोर
कन्नड, जि. औरंगाबाद ४३१००३
फोन : ०२४३५२२१७१८ मो. : ०९४२१४३२२१८




(टीप : ह्या अभ्यासकाचा अहिराणीचा भाषाशास्त्रीय अंगाने लिहिलेला अभ्यास- लेख या अंकात जागेअभावी घेता आला नाही.)



अनुक्रमणिका

# महाराष्ट्रातील ‘गोल्ला’ गोलेवार बोली :

डॉ. धोंडीराम वाडकर

गोल्ला गोलेवार हा समाज भटक्या विमुक्त जमातीतील आहे. आंध्रप्रदेशात गोल्लाची संख्या खूप मोठ्या प्रमाणात आहे. तरीही इतिहास सांगतो की, मुळात गोल्ला गोलेवार कृष्णवंशाचे आहेत. ते उत्तरप्रदेशातील मथुरेच्या जवळपास याची वसाहत होती. परंतु महंमद तुगलुकच्या काळात सैन्याला दूध पुरविण्यासाठी ते दक्षिणेत आले. त्यांचा व्यवसाय दूध व्यवसाय आणि जनावरांचे पालन-पोषण करणे हाच होता. त्यामुळे जनावरांना चारा मिळविण्यासाठी ते सतत भटकत असत. भारतात सर्व प्रदेशात विविध नावांनी ही जमात पसरलेली आहे.

आजही आंध्रप्रदेशात लोकसंख्या मोठ्या प्रमाणात आहे. तेथूनच मराठवाड्याच्या पूर्व सीमेवर ‘गोल्ला’ गोलेवाराची घराणी स्थिरावली. याचे कारण येथे डोंगराळ भाग असल्यामुळे जनावरास मोकळे रान व चारा मिळाला. म्हणून आजही लातूर, नांदेड जिल्ह्यात यांची संख्या मोठ्या प्रमाणात आहे. प्रस्तुत लेखात ‘गोल्ला’ समाजाच्या बोलीचा अभ्यास करावयाचा आहे.

सामाजिक भाषा विज्ञानाप्रमाणे विचार केल्यास संस्कृतोद्भव हिंदी आदि कुळातील भाषा आणि द्रवीड भाषेतील तेलगु आदि कुंल-भाषा; याचा परिणाम यांच्या मूळ भाषेवर झालेला असावा. महाराष्ट्रात मराठीचा परिणाम त्यांच्यावर झाला. अर्थातच संस्कृत कुल आणि द्रवीड कुल या दोन्ही भाषा कुलाचा परिणाम होऊन मिश्रस्वरुपात कधी तेलगू-बहूल तर कधी मराठी-बहूल भाषिक समुदाय गट या समाजात आढळतात. उत्तरेतून दक्षिणेकडे प्रवास घडल्यामुळे काही हिंदी भाषिक समूह महाराष्ट्रात स्थायिक झालेले आहेत. पण ते स्वतःला कृष्णावंशज मानतात आणि श्रीकृष्णाची भक्ती करतात. जे आंध्रप्रदेशातून आलेले आहेत ते मात्र कृष्णवंशज मानतातच पण खंडोबाची भक्ती करतात. एवढेच नव्हे, तर खंडोबाच्या नावाने प्रत्येक कुटुंबातील मोठा मुलगा वाघ्या सोडतात. येथे आंध्रप्रदेशाच्या संस्कृतीचा परिणाम भाषेवर, राहणीमानावर झालेला दिसतो. महाराष्ट्र आणि आंध्रप्रदेश सीमेवरील ‘गोल्ला’ समुहाच्या बोलीचा परिचय करून देण्याचा प्रयत्न आहे.

**भाषा परिचयाची पद्धती :** भाषेची तोंड ओळख व्हावी व सामान्यतः भाषा वैशिष्ट्ये कळावीत या दृष्टीने काही ठळक भाषा शास्त्रीय आणि व्याकरण या दृष्टीने उल्लेख केले आहेत.

नामे : (अ) अकारान्त पुल्लिंगी नामे :

| एकवचन मराठी | तेलगू एकवचन |
|---|---|
| लेक | विच्या |
| पलंग | यवम |
| कोट | कोयम् |
| बाजार | बझार |
| कान | चैयलू |
| पदर | कोलू |
| बामन | बामनडू |
| कुंभार | कुंभारडू |
| दीर | पलू |
| नाव | उंडमयेशीना |
| पितांबर | कोका |
| हार | समोलू |
| मांडव | मांडव |
| चोर | दोगा |
| बैल | यदू |
| सावकार | डुडूवाल |
| पुत्र | कोडकू |
| साव | कच्च्या |
| सड | सनलू |

नामे : (ब) अकारान्त स्त्रीलिंगी नामे :-

| **मराठी एकवचन** | **तेलगू एकवचन** | **मराठी अनेकवचन** | **तेलगू अनेक वचन** |
|---|---|---|---|
| पपय | पपयपंडू | पपया | पपडपंडू |
| तुळस | तुलशी | तुळशी | तुलशी |
| भीक | भिक्ष्यू | (भीक) भिका | भिक्ष्यू |
| भेट | कलीउटा | (भेटी) फेटा | कलीउटा |
| अंघुळ | स्नानम् | अंधुळी | स्नानम् |

| | | | |
|---|---|---|---|
| येस | बुरूज | (येसा) येशी | बुरूज |
| आंवळ | अल्न नेरनपंडू | आंबण | अल्न नेरनपंडू |
| विहीर | बावी | विहिरी | बावी |
| मांजर | पिल्ली | मांजरा | पिल्ली |
| आज | रोज | आजा | इरोजू |

१) अकारान्त स्त्रीलिंगी नामांपैकी वरील एकवचनावरून नावे अनेकवचनी होताना आकारान्त होतात. परंतु विकल्पाने साची ओकारान्त रूपे काही वेळा आढळतात.

२) अकारान्त स्त्रीलिंगी नामांपैकी वर निर्दिष्ट केलेली नामे अनेकवचन होताना ओकारान्त होतात. परंतु ती नामेदेखील विकल्पाने आकारान्त होताना आढळतात.

३) क्वचित काही नामे अकारान्त रूप बदलत नाहीत असे दिसते.

**शब्दप्रयोगी अव्यये :**

विषयी - गुरिची
वर - मीरा
खाली - क्रिन्दा
स, ला, ते - कू, कि, बद्कू
करिता, साठी - कोरकू, के
चा, ची, चे - मोक्का
ने, ए, शी - ल्ना, पेता
पर्यंत - वरकू
मध्ये - नडुमा
पलीकडे - अवनलिवै पु

**म्हणी व वाक्प्रचार :**

मराठवाड्याच्या पूर्व सीमावर्ती प्रदेशातल्या मराठी भाषेवर शेजारच्या आंध्रप्रदेशाच्या तेलगू भाषेचा ठसा उमटलेला आहे. काही मराठी म्हणी तेलगू म्हणीचे शब्दशः भाषांतर आहेत. या विभागात मला मिळालेल्या तेलगू किंवा मराठी या दोन्ही भाषेतील म्हणी 'मराठी म्हणी' व 'वाक्संप्रदाय कोश' यात सापडत नाहीत. या म्हणी मूळच्या कोणत्या भाषेतील आहेत, हे सांगणे कठीण आहे. ज्या म्हणीचे मूळ संस्कृतमध्ये आहे. ती संस्कृतमधूनच दोन्ही भाषांत उतरली असावी, असे अनुमान आपण सहज काढू शकतो. उदा. मराठीमध्ये 'दुरून डोंगर साजरे' ही म्हण आहे. तेलगूमध्ये याच अर्थाची 'दूरम कोंडलु नुनुमु' अशी म्हण आहे. या दोन्ही म्हणी संस्कृतमधील 'दूरतः पर्वतः रम्यः' या सुभाषितावरून आल्या असाव्यात. या विभागात तेलगू आणि मराठी दोन्ही पर्याय वापरात आहेत.

१) **काम थोडे गर्दी फार :** थोड्या कामाचा फार गाजावाजा झाला तर ही म्हण वापरतात. तेलुगुमध्ये ही म्हण 'पनी तक्वा लोल्ली मकवा' अशी आहे. 'पनी' म्हणजे काम. 'तक्वा' म्हणजे कमी, 'लोल्ली' म्हणजे गोंगाट आणि 'मक्वा' म्हणजे फार. काम कमी गोंगाट फार असा या म्हणीचा अर्थ आहे. तेलुगी व मराठी या दोन्ही म्हणीच्या प्रत्येक शब्दात व अर्थात साम्य आहे.

२) **तोंडाची फैरी गावाची वैरी :** तेलगुमध्ये ही म्हण 'नोरू उंन्नेवाडकू उरू आपति' अशी आहे. तोंड फ़टकळ असणाऱ्याला गावाची संकटे येतात. असा या म्हणीचा अर्थ आहे. तोंड असणारा 'नमेरू उन्नेवाडकू' फटकन बोलणारा किंवा लावालाव्या करणारा मनुष्य. 'उरू आपति' म्हणजे गावातील संकट स्वतःवर ओढून घेतो. असे या म्हणीचा अर्थ आहे. फटकळपणा हा गुण या म्हणीत सारखाच वर्णन केलेला आहे. मराठीत गावाशी वैर येते. तेलुगूमध्ये गावावरची संकटे स्वतःवर ओढून घेण्याची कल्पना आहे.

३) **'देणार ना घेणार दहादा घरला येणार'** कोणत्याही प्रकारचा मोबदला न देता स्वतःचे काम करून घेणाऱ्या माणसाबद्दल ही म्हण वापरली जाते. तेलुगूमध्ये ही म्हण 'इच्चेरोडू गादू पुच्चेरोडू गादू, इंटिकी मुटू मारला वच्चे रोडू मात्रय' अशी आहे. देणार ना विचारणार दहादा घरी मात्र येणार असा या म्हणीचा अर्थ आहे व (म्हणून असे वाटते की, या विभागातील तेलुगू म्हण मराठी म्हणीचे भाषांतर असावे.)

| मराठी वाक्ये | गोल्लाची तेलुगू | शुद्ध तेलुगू |
|---|---|---|
| हे कुत्र हाय. | उदि कुका उन्नवी | इदि कुक्कलू उन्नावी |
| ही कुत्री हायेत. | उदि कुका उन्नवी. | इदि कुक्का उन्नवी |
| तीन कुत्री हायेत. | उदि धुडू ककुलू उन्नदी | मुडू कुक्कुलू उन्नवी |

बोलीसाठी एक उदाहरण म्हणून एक लोकगीत देत आहे.

लग्न लागल्यानंतर प्रथेनुसार म्हणावयाचे लोकगीत.

तेलगू

*आनंद मॉ आनंद मॉ आयना*

(आनंद झाला सगळ्यांना)

*सारजजला को संतोष आयना*

(सर्वांना आनंद झाला आहे.)

*तलू तलू तजू रकू मुडीली*

*आनंद लगालू सेशीरी*

(आई-वडिलांनी मिळून लग्न केले.)

*आतानी मामानी गोडरी*

*वालू आनंद लगालू सेसीरी*

(सासू-सासरे, मामा-मामी मिळून आनंदाने लग्न केले.)

*बाबालू मरदूलू गुडीरी*

*आयतीत लगालू चेशारी*

(सारे मेव्हुणे एकत्र येऊन अतिशय आनंदाने लग्न केलेत)

*आयली तमूलू गुडीरी*

*तुल्लीला लगालू चेशरी*

*वदन्यालू मरदूरलू गुडीरी*

*वर्षालू लगालू चेशरी*

*आक्यानी चेललु गुडीरी*

*आक्यानी चेललू गुडीयी*

*देवाना लगालू चेशिसीरी*

*आनंद आती इडेकी आमना*

*वाडू सदा वेबि-पेनली केडूकू आमना*

(भाऊ बहिणी सर्व मिळून दीर, भावजय मिळून लग्न पार पाडतात.) अशा प्रकारची लोकगीते गाताना दिसतात.

बोलीचा समग्र परिचय करून देणे येथे शक्य नाही. वरील उदाहरणे भाषेची मोड कळण्याच्या दृष्टीने उपयुक्त होतील. पीएच.डी. साठीच्या "गोल्ला जमातीचे लोकजीवन व लोक साहित्याचा अभ्यास (लातूर व नांदेड जिल्ह्यासंदर्भात) या विषयावरील प्रबंध लेखनासाठी क्षेत्रीय अभ्यास केला. त्यात नांदेड, लातूरहे जिल्हे आंध्रप्रदेशाच्या सीमावर्ती भागात आहेत. मराठी आणि तेलगू भाषेचा जवळचा संबंध आहेच. आणि त्यातून 'गोल्ला' समाजाची मातृभाषा म्हणूनही लोक घरात तेलगू बोलतात. त्यामुळे मराठी तेलगू भाषेची मिश्र स्वरूप पाहावयास मिळते. या प्रदेशात राहणाऱ्या गोल्ला समुहाच्या बोलीचे अनेक नमुने लोकसाहित्य संकलन करताना गावपंचायतीतून निरीक्षण व प्रत्यक्ष संभाषण यातून मिळाले त्याचा वर्णनात्मक भाषाशास्त्राच्या दृष्टीने अभ्यास उपरोक्त प्रबंधात मांडला आहे. गोल्ला समाजाची भाषा ही मराठी पोटभाषा म्हणून अलिकडच्या काळात मांडता येणे शक्य आहे, असेच विधान करावे लागते. विविध भाषांचा मूळ हिंदी भाषिक समुहावर झालेला परिणाम किंवा घडलेला भाषा संपर्क यातून वर उल्लेख केल्याप्रमाणे हिंदी बहुल, तेलुगू बहुल, मराठी बहुल, अशा स्वरुपाची गोल्लाची बोली भाषा आढळते. मात्र संशोधनाच्या क्षेत्रात ती मराठी बहुलतेने आलेली दिसते. एवढेच तिचे स्वरुप लक्षात येण्याच्या दृष्टीने ही चर्चा केली आहे.

❖❖❖

**प्रा. डॉ. धोंडीराम संभाजी वाडकर**
मराठी विभाग प्रमुख,
अहमदनगर महाविद्यालय, अहमदनगर
फोन : (०२४१) २४४०३७६





अनुक्रमणिका

डॉ. यू. म. पठाण यांचा महत्त्वपूर्ण ग्रंथ

# फार्सी–मराठी अनुबंध

डॉ. अशोक कामत

मराठीत बहुभाषिक अभ्यासक कमी. त्यातून फार्सी अरेबिकची आणि त्याबरोबर हिंदी-संस्कृत-मराठीचीही जाणकारी असणारे किती ? आज तरी आपल्यापुढे एकच नाव येते : डॉ. यू. म. पठाण !

प्रा. डॉ. यू. म. पठाण हे मध्ययुगीन मराठी-हिंदी भक्तिसाहित्याचे गाढे अभ्यासक. एक उत्तम संशोधक-प्राध्यापक. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागाला नावारुपाला आणणारे आणि नव्या अभ्यासकांची एक पिढीच निर्माण करणारे नामवंत मार्गदर्शक. एक व्रतस्थ शिक्षक-संशोधक-प्राध्यापक म्हणूनच डॉ. पठाण जवळपास साठ वर्षांपासून कार्यरत आहेत. त्यांची संशोधनपर आणि ललित ग्रंथसंपदा विपुल आहे. त्यांचे अगदी ताजे पुस्तक **'फार्सी-मराठी अनुबंध'**. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने हे बहुमोल प्रकाशन केले आहे.

**ग्रंथाचे आगळेपण**

फार्सी ही भाषा मायमराठीच्या आदिकाळापासून महाराष्ट्राला परिचित आहे. ऐतिहासिक दस्तऐवज-कागदपत्रे, खलिते, कायदेकानू इत्यादींसाठी फार्सीचा वापर मुसलमानी अंमलापासून होऊ लागला. पण फार्सी भाषा इथं केवळ राज्यव्यवहारापुरतीच मर्यादित राहिली नाही. मराठी भाषा-साहित्य-संस्कृतीवरही फार्सीचा प्रभाव होत राहिला.

वहामनी काळ, शिवकाल आणि पुढे पेशवाईच्या दिवसांतही फार्सी-मराठीची मैत्री टिकली. मराठ्यांच्या इतिहासाचा ज्याला सखोल अभ्यास करायचा आहे, त्याला फार्सीची ओळख प्रथम करून घ्यावी लागते.

डॉ. यू. म. पठाण यांचे पिताजी, रावसाहेब यांच्याकडून त्यांना फार्सीचा वारसा लाभला. ते फार्सीचे व्यासंगी मराठी पंडित डॉ. माधवराव पटवर्धन यांचे विद्यार्थी. त्यांच्याच प्रेरणेने डॉ. यू. म. पठाण यांनी १९५८ साली मराठी पीएच्.डी.साठी फार्सी विषयक संशोधन-कार्य केले. 'मराठी बखरीतील फार्सीचे स्वरूप' हा त्यांचा ग्रंथ मराठीत बराच गाजला. त्याला अनेक पुरस्कार-सन्मानही लाभले.

प्रबंधपूर्तीनंतरही डॉ. पठाण फार्सी भाषा, बोली, याविषयी गेली. पंचेचाळीस वर्षे मनन-चिंतन करीत राहिले. इ.स.२००० मध्ये डॉ. यू. म. पठाण यांना दिल्लीच्या के. के. बिर्ला फाउंडेशनने तुलनात्मक भारतीय भाषाध्ययनासाठी राष्ट्रीय अभ्यासवृत्ती दिली. त्यामुळेच हा फार्सी मराठीच्या भाषिक-वाङ्मयाविषयक सांस्कृतिक अनुबंधावर सांगोपांग आणि मूलगामी प्रकाश टाकणारा ग्रंथ सिद्ध होऊ शकला. मराठी भाषा, बोली, साहित्य, इतिहास, लोकवाङ्मय, संस्कृती यांच्या अभ्यासक-संशोधकांना हा ग्रंथ विशेष उपयोगाचा ठरेल यात शंका नाही.

**ग्रंथाची मांडणी**

आरंभीच फार्सी-अरबीतील भाषिक अनुबंधाची व्याप्ती फार मोठी असल्याचे स्पष्ट करून पुढे दोन्ही भाषांतील ध्वनिविचार, रूपविचार, शब्दसिद्धी, अर्थविचार, शब्दसंग्रह, वाक्प्रचार, लिपिविचार, शब्द संक्षेप आणि शब्दमूल्ये यांचा विस्तृत ऊहापोह केलेला आहे. शेवटी मराठीच्या बोलींवरही फार्सीचा कसा प्रभाव आहे, याचा संक्षेपाने परिचय करून दिलेला आहे. सुमारे तीनशे पृष्ठांचे हे विवेचन, उभय भाषांतील व्यापक अनुबंध फार चांगल्या रीतीने विशद तर करणारे आहेतच, पण अभ्यासकांची भाषिक दृष्टीही विशाल करू शकेल असे आहे.

ग्रंथाच्या उत्तरार्धात दोन्ही भाषांतील वाङ्मयीन आणि सांस्कृतिक अनुबंधाची ओळख थोडक्यात करून दिलेली आहे.

अरबी-फार्सीच्या अपरिचित उच्चारांमुळे स्वरभक्ती, स्वरलोप, अर्धस्वरागम, अर्धस्वरलोप अशी अनेक ध्वनिपरिवर्तने मराठीत घडली. त्यामुळे मराठी भाषा-विज्ञानात नवी भर पडून या दोन भाषांचा अनुबंध अधिक दृढ झाला.

फार्सीच्या व्याकरणिक वैशिष्ट्यांनी मराठी भाषा प्रभावित झाली. व्यक्तींची आणि गावांची नावे देखील अरबी फार्सी शब्दांनी सिद्ध झाली. आडनावे, व्यवसायदर्शक नामांपासून सिद्ध झाली.



अनुक्रमणिका

मूळ फार्सी शब्दार्थ संकुचित, अर्थसंकोच झाल्याची काही उदाहरणे पाहण्यासारखी आहेत :

आमदार (सर्वसामान्य लोक बाळगणारा/ लोकप्रतिनिधी), खासदार (विशिष्ट लोक बाळगणारा प्रतिनिधी/संसदेतून निवडून आलेला), वतन (जन्मभूमी/ मिळालेले उत्पन्न), मुकादम (प्रमुख पुढारी/कामगारांवर देखरेख करणारा), तावदान (आमकाच/खिडकीची साधी काच), खैरात (चांगल्या वस्तू/मोफत) इत्यादी.

अशीच अर्थच्युतीची उदाहरणे पाहण्यासारखी आहेत.

अवलिया- (ईश्वर मित्र/उपद्व्यापी, लबाडी), इरसाल- (पाठवायची रक्कम / बोली), कारभार (कामकाज / नसता उद्योग), खलबत (एकांतातील बोलणे / गुप्तयोजना), गुर्मी (उष्णता / मग्रुरी) हरकत (हलचाल/आक्षेप), फाजिल (अधिक/चावट)

अर्थविस्ताराची उदाहरणेही मजेशीर आहेत :

सल्लामसलत (सुयोग्य उपदेश), शेखी (प्रमुखत्व), लवाजमा (आवश्यक वस्तू), दुही (द्वैत) रहदारी (रस्तापट्टी), कहर (कोप, क्षोम), जंगी (युद्धविषयक), जडजवाहीर (जर, सोने, रत्ने)

काही ठिकाणी फार्सी मूळ अर्थापेक्षा अधिक प्रतिष्ठेचा अर्थ शब्दांना देण्यात आला आहे अब्रू (चेहरा-इभ्रत, प्रतिष्ठा), अस्सल (मूळचे, खरे-जातिवंत), इतमाम (व्यवस्था-सन्मान), इमान (ईमान-श्रद्धा-सचोटी, एकनिष्ठा), ऐवज (बदला, मालमत्ता, द्रव्य), कसोशी (कोशिश-प्रयत्न-पराकाष्ठा), कारागीर (कार्गीर- काम करणारा कामकरी-कसबी व्यावसायिक), गरीव (दीन, दुबळे-शांत, सुस्वभावी, पोक्त (पुख्तह-पिकलेला, प्रौढ), बुजुर्ग (वृद्ध-आदणीय अनुभवसमृद्ध, मेजवानी (मेजवानी-आतिथ्य-थाटाचे जेवण), शक्कल (शक्ल-चेहरा-युक्ती), दस्तआवीज (प्रमाणपत्र-ऐतिहासिक महत्त्वाचे कागद)

असेच मूलार्थी ऐवजी सूचित अर्थाचे शब्द आहेत. (खून-रक्त, हत्या/खुष्की-कोरडी-जमिनीवरील मार्ग), (पागा-पायगाह-पाय ठेवण्याची जागा, घोड्यांची जागा), (बस्ता-बांधलेले गाठोडे, लग्नाचे कापडचोपड). कुठे अर्थाचे विशेषीकरण दिसते. कधी ग्राम्यता परिहार आढळतो. कधी दोन वस्तूंतील समानतेमुळे अर्थ व्याप्ती वाढते. डॉ. यू. म. पठाण यांनी या भाषा संमिश्रणाची दिलेली उदाहरणे मोठी रंजक आहेत.

'शब्दसंग्रह' या स्वतंत्र प्रकरणात त्यांनी आजवर मराठीत आलेल्या अर्वी-फार्सी-तुर्की शब्दसंपदेचा कुणी कसा वापर केला यावर सौम्य शब्दात लिहिले आहे. इतिहासाचार्य राजवाड्यांच्या अभ्यासाविषयी त्यांनी ज्या संयमाने लिहिले आहे ते ध्यानात घेण्यासारखे आहे. (पृ. १९७-९९) पुढे युद्ध, स्थापत्य, शासनव्यवहार, कायदा, अर्थव्यवहार, धर्म, खाद्यपेये इत्यादी एकूण चौतीस विशिष्ट्य क्षेत्रातील शब्दांची त्यांनी चर्चा केलेली आहे.

'आर्यभाषेच्या दोन वेगळ्या प्रदेशातील शास्त्रांचे हे पुनर्मीलन आगळेवेगळे लज्जतदार आहे. मराठमोळेही आहे. भाषाशुद्धीसारख्या काही चळवळींनी त्यावर संकट आले नाही. कारण मराठी मातीत ही बीजे रुजली, अंकुरली आणि वाढली होती.' (पृ. २२६) हे डॉ. पठाण यांचे म्हणणे योग्यच आहे.

**काही महत्त्वाचे निकर्ष :**

संत तुकाराम-रामदासांच्या भाषेचा आजच्या मराठीच्या जडणघडणीवर झालेला परिणाम लक्षणीय आहे. या दोन्ही महापुरुषांची प्रकृती भिन्न असली तरी तत्सम-तद्भव शब्दांवरोवरच ते अरवी-फारसी शब्दांचा विपुल प्रयोग करीत मराठी अधिक प्रभावी करतात.

चौदाव्या शतकापासूनच महाराष्ट्रात मुसलमानी सत्ता निर्माण झाली. फार्सी ही राजभाषा झाली. राज्यव्यवहारावरोवरच लोकव्यवहारातही या भाषेचा वापर करण्यात आला. दगा, फजिती, सिक्का, हिंमत, वजन, जादा, इमान, शरम, बेशरम, गुलाम, कागद, दिवाण, साल, कायदा, वेकायदा, अस्मानी, जाब, जवाव असे कितीतरी शब्द मराठीत मिसळून गेले.

मराठी संतसाहित्य, विशेषेकरून संत एकनाथांचे वाङ्मय, पद्यात्मक पत्ररचना आणि पत्रात्मक गद्य, बखर लेखन, शाहिरीकविता इत्यादींवर फार्सीचा उमटलेला ठसा अतिशय स्पष्ट आहे. केवळ पत्रांविषयी विचार केला तरी किमान त्र्याऐंशी फार्सी पत्र-प्रकारांच्या लेखनशैलींचा आणि आकृतिवंधांचा प्रभाव आपल्याला पाहता येतो.

संत एकनाथांची आणि समर्थ रामदासांची हिंदी वाणी दखिनी हिंदी प्रभावित आहे. मुळात दखिनी ही भाषाच

(पान क्र. ४७ वर पहा...

# कविवर्य मंगेश पाडगावकरांचा नवा 'आनंदऋतु'

अंजली कुलकर्णी

वयाच्या ८०व्या वर्षीदेखील सृजनाच्या बहरानं सतत फुलत, फळत असणारा आनंदऋतु म्हणजे कविवर्य मंगेश पाडगावकर ! वयाच्या ८०व्या वर्षीदेखील पाडगावकरांच्या कवितांचं झाड नवनव्या प्रतिभेच्या फुलाफळांनी बहरत राहिलं आहे. त्यांच्या नवनवोन्मेषशालिनी प्रतिभेचे विविध उद्‌गार 'धारानृत्य', 'जिप्सी', 'लोरी', 'बोलगाणी', 'सलाम', 'अकरावी दिशा' अशा तब्बल ३५ कवितासंग्रहांमधून आजवर रसिकांसमोर सादर झाले आहेत. नुकताच त्यांचा नवा संग्रह 'गिरकी' प्रकाशित झाला आहे. वयाच्या ८०व्या वर्षी आलेल्या या कवितासंग्रहात बरोबर ८० कवितांचा समावेश आहे, ज्याचं गमक पाडगावकरांनी कवितासंग्रहाच्या सुरुवातीला श्री. पु. भागवतांविषयी लिहिलं आहे. पाडगावकर आणि श्री. पु. या दोघांमधल्या जवळजवळ ६० वर्षांच्या अतूट, उबदार स्नेहाविषयीही पाडगावकरांनी इथे लिहिलं आहे. प्रकाशक आणि कवी यांच्यातल्या व्यवहाराचं नातं ओलांडून गेलं की दोन प्रतिभाशाली आणि तीव्र संवेदनशील व्यक्तींमध्ये किती उत्कट आणि प्रगल्भ नातं निर्माण होऊ शकतं याचं प्रत्यंतर या लिखाणात मिळतं. प्रकाशित करण्याच्या पुस्तकांविषयी एक प्रकाशक म्हणून श्री. पु. किती सजग आणि काटेकोर असत, तसंच नवनव्या साहित्याविषयी केवढी आस्था, प्रेम आणि उत्सुकता त्यांच्या मनात असे याविषयीही पाडगावकरांनी मनापासून लिहिलं आहे.

'गिरकी' या कवितासंग्रहातल्या कविता पाडगावकरांच्या कवितांची सर्व वैशिष्ट्यं जपणाऱ्या आहेत. पाडगावकरी खास शैलीचा स्पर्श यातल्या कवितांना आहेच; परंतु आशयाच्या अंगानं एक वेगळा अनोखा सूरही पाडगावकर आळवताना जाणवतात. हा सूर नक्की कसला आहे याचा थेट थांगपत्ता लावता येणार नाही. परंतु काहीसं व्याकूळ करणारं आतल्या आत डहुळणारं असं एक काहूर या कवितांमध्ये प्रथमतः जाणवतं.

जीवनाच्या कृतार्थतेचं गाणं पाडगावकरांनी आयुष्यभर गायलं. 'जगायचं कसं कण्हत कण्हत की गाणं म्हणत' असं म्हणणाऱ्या पाडगावकरांनी कवितेतला 'आनंदऋतु' अक्षरशः भोगला. बाराही महिने सुरू असलेल्या या आनंदऋतुचा सोहळा ते आजही मनापासून साजरा करत आहेत.

पाडगावकरांनी कवितेमध्ये वेगवेगळे प्रयोगही केले. विविध छंद, वृत्तं त्यांनी लीलया हाताळले. गीतस्वरुप हे त्यांच्या कवितांचं एक महत्त्वाचं वैशिष्ट्य. कवितेच्या, गाण्याच्या तांत्रिक अंगावर त्यांचं विलक्षण प्रभुत्व आहे. बिनचूक छंद, वृत्त हे त्यांचं वैशिष्ट्य आहे. परंतु म्हणून केवळ अचूक छंदात लिहिलेला निबंध असं त्यांच्या कवितेचं कधीच झालं नाही. उत्तम तंत्र वापरूनही त्यातील तांत्रिक बाब खुपणार नाही, इतक्या सहजतेनं त्यांची गाणी उतरून येत. याचं कारण पाडगावकरांनी छंदवृत्त वापरताना मुळातली अस्सल कविता कधीच निसटू दिली नाही. त्यातील लवलवत्या अंकुरासारखी ! काव्यात्म अनुभव त्यांनी परोपरीनं जपला, नव्हे; त्यावरच लक्ष केंद्रित केलं.

छंदोबद्ध कविता गाणी यांच्या बरोबरच त्यांनी वात्रटिकाही अनेक लिहिल्या, उदासबोधासारखं उत्तम काव्य लिहिलं. प्रेमानुभवात रमणारी त्यांची कविता सामाजिक अंगानंही फडकत राहिली. सामाजिक वास्तवाचा भेद करणारी तीव्र स्वरातली 'सलाम'सारखी कविताही त्यांनी लिहिली. 'मोरू' सारखं भन्नाट भाष्य काव्य लिहिलं. एका प्रकारची कविता त्यांनी कधीच लिहिली नाही. अनुभूती आशय, प्रकटीकरणातली विविधता त्यांनी जाणीवपूर्वक जोपासली.

'गिरकी' या संग्रहात बहुतांश मुक्त छंदातल्या कविता आहेत. अर्थात् पाडगावकरांच्या मुक्तछंदाला एक लडिवाळ अशी आंतरिक लय असतेच. तशी ती इथेही आहे. पाडगावकरांच्या मुक्तछंदाचं वैशिष्ट्य असं असतं की कडव्याच्या एका एका ओळीत एकेक आशयपदर पूर्ण होऊन जातो. एक एक कडवं म्हणजे कवितेच्या आशयाचा एकेक नेमका आणि संपृक्त हिस्सा. अशी हिश्शाहिश्शाने कविता शेवटी बरोबर मुक्कामाला पोहोचते, टीपेला

पोहोचते, सम गाठते. उदा. 'भय' या कवितेत.

*'रस्त्यावरून चालताना मोटार उठवून देईल*
*हे त्याचं भय आता अगदीच जुनं झालंय.*
*कोणीतरी मागून येऊन रामपुरी सुरा खुपशील*
*हेही त्याचं भय आता इतकं जुनं झालंय की*
*रामपुरी सुऱ्याला त्या कल्पनेतल्या गंज चढलाय !'*

इथे आशयाचं एक आवर्तन पूर्ण होतं. दुसऱ्या कडव्यात दुसरं. अशा रीतीने कविता सुफल संपूर्ण होते. म्हणूनच पाडगावकरांची कविता सर्वांगानं. तंत्र आणि आशय या अंगानं परिपूर्ण असते.

पाडगावकरांच्या कवितेचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे त्यातली नाट्यमयता. अतिशय नाट्यमय पद्धतीनं, चित्रदर्शी शैलीमध्ये पाडगावकर आपल्या समोर कविता 'उभी' करतात, 'गिरकी' या संग्रहात 'घोटाळा', 'म्हातारा', 'लाडवाची गोष्ट' अशा नाट्यकथात्म शैलीतल्या अनेक कविता आहेत. त्यातही स्वतःशीच बोलत असल्यासारख्या, नाटकातल्या स्वगतासारख्या शैलीत त्यांच्या अनेक कविता येतात. उदा. 'लिहिणं' या कवितेत-

*'कधी कधी अनेक महिने महिने*
*नवं ताजं अक्षरसुद्धा सुचत नाही*
*वांझपण फांदीवर कावळ्यासारखं बसून*
*तुम्ही खालून जाताना तुमच्यावर पिटतं*
*म्हणून तुमचं लिहिणं थांबतं थोडंच ?'*

असा रॉबर्ट ब्राऊनिंगच्या ड्रॅमॅटिक मोनोलॉगशी जवळीक साधणारं काही पाडगावकरांच्या शैलीत सापडतं.

पाडगावकरांच्या शैलीविषयी आजपर्यंत भरभरून लिहिलं बोललं गेलं आहे. त्यांची अगदी नेमकी, बाणासारखी अर्थवेध घेणारी कवितेच्या बाह्य सौंदर्याबरोबर आतल्या आत्मिक सौंदर्याचा प्रत्यय देणारी शब्दरचना हेदेखील त्यांच्या कवितेचं वैशिष्ट्य म्हणता येईल. 'कोवळा नाजूक काळोख' अशी शब्दरचना ते लीलया करून जातात.

पाडगावकरी तत्त्वज्ञानाचा एक झरा या कवितांमधून झिरपत राहिलेला दिसतो. 'जीवन सुंदर आहे त्याच्या सौंदर्याचा आनंद घेतला पाहिजे.' अशा प्रकारचं एक सकारात्मक, आशावादी, सौंदर्यवादी दृष्टिकोन पाडगावकरांनी आपल्या कवितेतून दिला आहे. पण एवढंच करून पाडगावकर थांबलेले नाहीत. जीवनाच्या वास्तवाचं भेदक, करुण दर्शनही त्यांनी दाखवलं आहे.

*'कुंडीतलं रोप' या कवितेत ते म्हणतात-*

*''कुंडीत फूल जन्माला आलं म्हणून*
*दंगे मुळीच थांबणार नाहीत*
*रामाचं अल्लाचं स्मरण करीत*
*हा त्याला तो याला भोसकणारच''*

किंवा 'झाडं भिऊ लागली आहेत' या कवितेत निसर्ग आणि समाज यांच्या दुरावत चाललेल्या नात्याचं ते दर्शन घडवतात. 'भय' या कवितेत सामान्य माणूस किती प्रकारच्या भयांना तोंड देत, जगतो आहे; हे सांगितलं आहे.

पाडगावकरांची कविता सश्रद्ध आहे; पण बोधवादी नाही. केवळ आत्ममग्नतेत ती रमू शकत नाही. इतरेजनांच्या सुखदुःखाशी ती एकरूप होऊ पाहते. 'स्व' आणि 'स्वेतर' अशा दोन्हीशी सहकंप पावताना जगण्यावरचा गाढ विश्वास ती 'स्व' आणि 'स्वेतर' दोघांनाही पुरवते. जीवनावरचा गाढ विश्वास, उमेद आणि जीवनातील सौंदर्याचे आकर्षण याचा वसा ती आपल्या कवितेच्या रसिक वाचकांना देऊ इच्छिते. ते करताना या कवितेला जाणीवपूर्वक पोज घ्यायला लागत नाही. एखादं फूल फुलून यावं इतक्या सहजतेनं त्यांची कविता वाचकांना स्वर्गीय आनंद देते. म्हणूनच जेव्हा पाडगावकर म्हणतात-

*कंटाळून आपल्या आयुष्याला*
*मरावं असं कधी वाटलं तर*
*पाखरू येऊन फांदीवरती*
*अगदी अलगद बसतं तशी*
*उमेद माझ्या कवितेतली*
*खांद्यावर तुझ्या येऊन बसावं*

तेव्हा ते आपल्याला मनोमन पटलेलं असतं.

---

'गिरकी' मंगेश पाडगावकर,
मौज प्रकाशन, गिरगाव, मुंबई,
प्रथमावृत्ती, १० मार्च २००८

**अंजली कुलकर्णी**
३ विघ्नहर अपार्टमेंटस्, जयवर्धमान सोसायटी,
बिबवेवाडी रोड, पुणे ४११ ०३७.



अनुक्रमणिका

पुस्तक परिचय

# हळव्या, भावगर्भ कथांचा संग्रह– 'मनस्विनी'

नंदा सुर्वे

अनेकांच्या लेखनाचा शुभारंभ कथालेखनाने होतो. कारण तो सहजसाध्य वाटतो. पण प्रत्यक्षात अनेकदा तो फसलेला दिसतो. काही लेखकांनाच त्याचा मूलमंत्र सापडतो. त्यांच्या कथालेखनात सखोल अभ्यास दिसतो. अशा कथांना यशाचा गाभारा लाभतो. अशाच यशाच्या गाभाऱ्यात प्रवेश करणाऱ्या एक कथा-लेखिका आहेत- सरोज सोनावणे. त्यांचा 'मनस्विनी' हा दुसरा कथासंग्रह वाचकांसाठी सिद्ध झालेला आहे. याच्या आधी त्यांचा 'पक्षिणी' नावाचा कथासंग्रह प्रसिद्ध झाला आहे. वाचकांनी त्याचे चांगले स्वागत केले आहे. सुजाण वाचक हा एक साहित्याचा आधारस्तंभ असतो. लेखनामध्ये सामर्थ्य दिसल्याशिवाय तो दाद देणार नाही. स्वागत करणार नाही. सरोज सोनावणे यांच्या 'मनस्विनी' या दुसऱ्या कथासंग्रहाचेही मनःपूर्वक आणि दमदार स्वागत होईल अशा विश्वास वाटतो.

यातल्या साऱ्या कथा एका विशिष्ट वेगाने वाचकाला पुढे नेत रहातात. कुठेही जरासुद्धा कंटाळवाण्या होत नाहीत. कथेची सुत्रबद्ध मांडणी फार महत्त्वाची असते. अन्यथा कथा मूळमार्ग सोडून बाहेर जाते. कुठेही भरकटते. विनाकारण पसरट होते. अशी कथा मनाला भावत नाही. भिडत नाही. त्यामुळे तिला यशस्वी कथेचा मापदंड लावता येत नाही. सरोज सोनावणे यांनी दर्जेदार कथालेखनाचं भान अगदी व्यवस्थित सांभाळलं आहे. मुख्य म्हणजे कथेचा जीव केवढा आहे; हे पाहून त्यांनी कथेची लांबी रुंदी बेतली आहे.

संग्रहातल्या 'मनस्विनी' या शीर्षक कथेचा आवर्जुन उल्लेख करायला हवा. कोर्टाच्या आवारात एकदा त्यांना ही 'मनस्विनी' भेटली होती असं त्यांनी मनोगतात म्हटलंय. तिच्यावरून त्यांनी ही मनोज्ञ कथा बेतली आहे. आपल्या नवऱ्यावर खूप निष्ठा, खूप प्रेम असणारी नायिका या कथेत आहे. एकदा मात्र तिच्या निष्ठांना, विश्वासाला तडा जाणारा प्रसंग घडतो. दुसऱ्या स्त्रीशी रत झालेल्या नवऱ्याला पहाण्याची दुर्दैवी वेळ तिच्यावर येते. ती सुरूवातीला सैरभैर होते. हेलपाटते. कोलमडते. नंतर हळूहळू स्वतःला सावरून घ्यायला लागते. नवऱ्याला पूर्णपणे तोडून टाकण्याचा, त्याच्याशी फारकत घेण्याच्या निर्णयाप्रत येते. कॉलेजमध्ये शिकणाऱ्या दोन मुलांना घेऊन घर सोडते. शिकवण्या करून हा त्रिकोणी प्रपंच चालवते. नवऱ्याचा एक पैसाही घेत नाही. म्हणून लेखिकेनं तिला 'मनस्विनी' म्हटलंय. ही स्त्री स्वाभिमानी आहे. अगदी टोकदार स्वाभिमानी. या टोकदारपणाची एक पायरी खाली उतरून हिनं नवऱ्याकडून 'मेंटेनन्स' घ्यायला हरकत नव्हती असं वाटतं. कारण मुलं ही त्याचीही जबाबदारी होती ना ! मग नवऱ्याला मोकाट का सोडायचं ? त्याला असा ना तसा फटका बसू द्यायला हवा होता, शिक्षा म्हणून. पण या मनस्विनीला अशा शिक्षेइतकंही त्याला मापायचं नव्हतं. गणायचं नव्हतं.

लेखिकेची 'सापळा' ही कथाही मोठा धक्का देऊन जाते. आपल्याला हवा तसा आपला बॉस आपल्याकडे वळत नाही. आपली मोहिनी त्याच्यावर पडत नाही म्हणून त्याला जाळ्यात ओढण्यासाठी ती एक डाव रचते. बॉसमधल्या पुरुषपणाला आवाहन देते; आणि तिचा विजय होतो. तो बॉस बरोबर तिच्या सापळ्यात सापडतो. त्याची पार वाट लागते. अहंकारानं पेटलेल्या एका स्त्रीमध्ये केवढं बळ येतं आणि त्यापुढे पुरुष कसा लेचापेचा ठरतो हे या कथेतून माडलं आहे. यातल्या स्त्रीच्या बळाची भलावण करायची नाही; कारण त्या बळात हिडीसपणा आहे. अशा सूडानं पेटलेल्या स्त्रिया एखाद्याचं कसं खच्चीकरण करू शकतात हे ही कथा दर्शवते. कथेच्या सुरूवातीला लेखिकेनं म्हटलंय की माणसाचं मन हा अथांग डोह आहे. या डोहाच्या तळाशी तेजस्वी सूर्यबिंबही असू शकेल किंवा गर्द काळोखही असू शकेल. याचा गर्भितार्थ 'सापळा' मध्ये सापडतो

'जिद्दी' ही कथा अंतर्बाह्य ढवळून काढणारी आहे. सासरी गेलेल्या बहिणीच्या आयुष्याची झालेली परवड, तिची झालेली फरपट, पडझड आणि अखेरीस होणारा कडेलोट धाकट्या सुवर्णाला अस्वस्थ करतो. अंतर्मुख करतो. त्याहीपेक्षा ती दुभंगून जाते ती आईवडील आणि

आजोबा यांच्या निष्क्रियतेच्या पवित्र्यानं ! त्यांचा हा कृतीशून्य पवित्रा सुवर्णाचा प्रक्षोभ वाढवतो. मुलीचा कितीही छळ झाला, तिचं जगणं असह्य झालं तरी 'दिली तिथे मेली' अशी धारणा ठेवणारे, आप्तांना, समाजमनाला घाबरणारे हे लोक पाहून सुवर्णा एकीकडे कासाविस होते; तर दुसरीकडे स्वबळावर, स्वतंत्रपणे उभं रहाण्याचा निर्णय घेते. इतकं कटु वास्तव पाहिल्यानंतर तिच्या मनात लग्नाविषयी घृणा निर्माण होते. पुढे वकील होऊन अशा पीडित महिलांना उभं करण्याचं व्रत ती अंगिकारते.

'कृतघ्न' ही लहानशीच पण मोठा जीव असणारी कथा आहे. विषय नेहेमीचाच आहे. नवऱ्यामागे काबाडकष्ट करणारी आणि मुलांना वाढवणारी आई आणि पुढे मुले मोठी झाल्यावर आईची त्यांच्याकडून होणारी उपेक्षा. हा कृतघ्नपणाचा डंख सोसणारी आई. असं कथासूत्र आहे. पण यातली भाषा आणि जीवघेणे प्रसंग वाचकांना अंतर्मुख करून टाकतात. दोन्ही मुलांकडून आईचं बहिष्कृत होणे हे विदारक वास्तव पचवणं जड जातं.

'मनस्विनी' या संग्रहातील सर्वच कथा वाचताना जाणवतं की लेखिकेचं मन संवेदनशील असल्यानं या कथा अत्यंत सहृदयतेनं लिहिलेल्या आहेत. कधी कधी वाटतं, या केवळ कथा नसून ही सारी गर्दगहिरी भावांकने आहेत. काळजाला भिडणारं हे लेखन आहे.

लेखिकेनं मनोगतात म्हटलंय, 'हळदुल्या सोनेरी उन्हात, संध्याकाळी भरारा चिमण्या अंगणात उतराव्यात तशा आयुष्याच्या संध्याकाळी कथा-कविता माझ्या अंतरंगात उतरल्या.' खरं तर आयुष्याच्या संध्याकाळी म्हणजेच प्रगल्भ वयात या कथा अंतरंगात उतरल्यात हे सुचिन्ह आहे. ही संध्याकाळ दमदार असते. निवांत असते. म्हणून या वयात लिहिलेली कथा कसदारपणाचं लेणं घेऊन उतरलीय हे आवर्जुन सांगायला हवं.

❖❖❖

('मनस्विनी' - सरोज सोनावणे, मधुश्री प्रकाशन, पाने १३०, किंमत १३५/-)

**नंदा सुर्वे**
एफ/१, अशोका पार्क,
अनंतरंग, २७/३, हिंगणे खुर्द,
सिंहगड रोड, पुणे ४११ ०५१.

---

(पान क्र. ४३ वरून पुढे...

फार्सी प्रभावातून विकसित झाली. नाथांची वैशिष्ट्यसंपन्न ठरलेली भारूडे, विशेषतः अर्जदस्त, जाबचिठ्ठी, ताकीद पत्र, कौल पत्र आणि रामदासांची अशाच प्रकारची रचना उल्लेखीय आहे.

फार्सी प्राचीन रूबाई, मसनवी आणि गजल विशेष समृद्ध मानली जाते. यापैकी गजल मराठी मध्ये जुन्या काळापासून प्रचलित झाली. आधुनिक मराठी कवितेत अलिकडे गजल बरीच नावारुपाला आलेली आहे. आधी डॉ. माधवराव पटवर्धनांची 'गज्जलांजली' प्रकाशित झाली. तिची काहींनी खिल्लीही उडविली. पुढे भाऊसाहेब पाटणकर आणि सुरेश भट यांनी गजल लोकप्रियतेच्या शिखरावर आणली. गजलेचे मूळचे 'प्रेमगीत' हे रूप अधिक व्यापक आणि समर्थ समृद्ध करण्याचे श्रेयही मराठीला मिळाले आहे.

डॉ. यू. म. पठाण यांचा हा ग्रंथ मराठी भाषा विषयक लेखनात मोलाची भर घालणारा तर आहेच, पण त्यातून संशोधन-कार्यासाठी नवे अभ्यासविषय मिळू शकतात.

डॉ. पठाण यांचा भर भाषाशास्त्रीय विवेचनावर राहिलेला आहे. फार्सी-मराठीच्या सांस्कृतिक अनुबंधाचे त्यांनीच म्हटल्याप्रमाणे विवेचन संक्षिप्त आहे. पण जे आहे ते फार महत्त्वाचे आहे. हा विषय यापुढे अधिक अभ्यासाला चालना देऊ शकेल असा आहे. डॉ. पठाण यांनी त्यासाठी चांगली पायाभरणी केलेली आहे. त्यांच्या या ग्रंथाचे मराठी अभ्यासक स्वागत करतील; आणि त्यांचे कायमचे ऋणी राहतील.

❖❖❖

**(फार्सी-मराठी अनुबंध,**
लेखक : डॉ. यू. म. पठाण)

**डॉ. अशोक कामत**
'शिवश्री', २५८, सहजीवन कॉलनी,
पर्वती, पुणे - ४११ ००९.
दूरभाष : (०२०) २४२२२४९५

# 'मृगचांदणी' न्याहाळताना...

ज्योत्स्ना चांदगुडे

'मृगचांदणी' हा प्रभा सोनवणे यांचा तिसरा कवितासंग्रह. मनातील भावभावनांचा ओघवता तरल आविष्कार म्हणजे प्रभा सोनावणे यांची कविता. त्यांना भूतकाळाचे आकर्षण वाटते. एकीकडे खानदानी चौकटीचा अभिमान तर दुसरीकडे मुक्ततेचा ध्यास. अशा द्वंद्वातून त्यांची कविता रसिकांच्या भेटीला येते. नातेसंबंधातील कडू अनुभवातून मन आक्रंदत राहतं. स्त्री-मनाची घुसमट वाचकाला अंतर्मुख करते. पण मला या साऱ्या कवितांचं बलस्थान वाटतं ते म्हणजे प्रभाच्या निखळ प्रेमकविता. सामाजिक, वैचारिक आणि भावनिक अशा सर्वच विषयांना स्पर्श करणारी प्रभाची लेखणी विविध रचनाबंधही स्वीकारताना दिसते. अर्थात् रचनेपेक्षा तिच्या आशयात वैविध्य आणि नाविन्यही आहे.

प्रभाची कविता 'फुलवाती' सारखी मंदपणे मनात जळत असते. कवितेचं लिखाण सुरू झालं तेव्हापासून तर

*सांग 'प्रभा' तुज काय पाहिजे इथे अजून*
*रिक्त तुझ्या या जीवनात बहरली ग़ज़ल ।*

असं म्हणत कविता कशी बहरली हे कवितेतूनच व्यक्त होत राहते. कवितेचं हे वेड विविध क़वितांमधून मग आविष्कृत होतच राहतं.

'आई' विषयी असणारा सार्वत्रिक प्रेमभाव, आदर, प्रेम, जिव्हाळा, आपुलकी, ऋण या भावना प्रभाच्याही कवितेत दिसून येतात.

*कष्ट तिचे कुणा दिसेना दुःख हे जीवघेणे*
*भ्रमिष्टापरी मृगजळात धावावे लागते.*

हे म्हणताना आईचे कष्ट, मुलांसाठीचे जगणे, स्वतः दुःखात राहून मुलांना वाढविणे सारं आठवताना आईचे भरल्या घरातून जाणे किती दुःखाचे असते हे ही ती व्यक्त करते. पण त्याचबरोबर समाजात आईचे होणारे हालही पाहवत नाहीत, तेव्हा तळमळून ती म्हणते-

*सफेदपोशा कडक इस्त्रीवाल्यांची*
*वणवणवते रस्त्यावर मळते आई.*

सामाजिकतेचं भान असणारी प्रभाची कविता आईच्या तरल नात्याचाही असा वास्तव वेध घेताना दिसते. 'सैनिक हो-' या सारख्या कवितेत सीमेवर लढणारे सैनिक आणि वृत्तपत्राच्या पानावरील फोटोत मिरवणारे समाजसुधारक यांच्यातील विरोधाभास सहजगत्या उलगडत जाते अशी सामाजिक जाणिवेची कविता लिहिता लिहिताच स्त्री जाणिवेची कविताही अत्यंत ओघवत्या शैलीतून ती मांडते. स्त्री जाणिवेच्या या कविता वाचल्यानंतर प्रभाच्या मनातील घुसमट आपल्याही घायाळ करते. प्रखर वास्तवाचं भान करून देते.

*'बाईच्या जातीनं निमूट जगावं*
*दावणीला बांधलेल्या गाईसारखं ।'*

असं म्हणताना स्त्री आणि गाय यांच्यातील 'गोरीव बिच्चारी' हा गुण तिला समान वाटतो; आणि धर्मसंस्कृतीचं चर्वण करीत, सणावारी गोग्रास खाणारी गाय आणि स्त्री यातील साम्य ती व्यक्त करते. 'तिच्या जाणिवा' या सारख्या कवितेत स्त्रीचं जग कसं असावं अशी पुरुषप्रधान संस्कृतीची भावना व्यक्त करताना ती म्हणते.

*तव्यावर टम्म फुगलेल्या*
*चपाती इतकंच असावं तिचं जग ।*

'रांधा, वाढा, उष्टी काढा' या उक्तीप्रमाणेच स्त्रीनं जगावं; अशी वैचारिकता असलेल्या समाजात स्त्रीचं काय होणार? तेच वास्तव, तीच घुसमट प्रभाची कविता व्यक्त करत राहते.

अनुभवांना थेट भिडणं हे प्रभाच्या कवितेचं वैशिष्ट्य म्हणूनच तिची शब्दचित्रे जिवंतपणे समोर ठाकतात. अनुभवांना समर्पक शब्दकळा असल्यामुळे क्वचित् ती कठोर व कडक होते; पण आशयाशी प्रामाणिक अशी तिची कविता बनते. 'वाघीण' आणि 'गोष्ट वडलांची' या सारख्या कवितेत ती भीडभाड न राखता स्पष्ट व परखड शब्दांत व्यक्त होते. पिंपळवृक्ष, सखे सुनबाई यासारख्या कवितेत तीच शब्दकळा हळुवार होताना दिसते.

आपलं वडिलोपार्जित घर, वैभव याचं आत्यंतिक आकर्षण आणि त्यामुळे खानदानी चौकटीची ओढ जाणवते. भूतकाळातील आठवणींशी ती एकरूप होते. 'एका खानदानी शहरात', 'डियर सिस्टर', 'मृगचांदणी',

'गोष्ट वडलांची' यांसारख्या कवितातून ते खानदानीपण ओसंडत राहतं. आज रस्ते या गझल मध्ये ती म्हणते...

*काल जेथे होत होते सप्तरंगी सोहळे*
*खानदानी तेच वाडे कोसळाया लागले*

भूतकाळाची ओढ आणि मुक्ततेचा ध्यास तिच्या कवितेला आहे. मुळे खोल रुजलेली आहेत. पावलांना पंखाची आस लागलेली आहे. ही मुक्ततेची ओढ वृषभ, उद्धार सारख्या अनेक कवितातून व्यक्त होते. आपण इतरांशी चांगले वागतो पण इतर मात्र आपल्याशी वाईटच वागतात हेही ती 'साशंक' सारख्या कवितेतून व्यक्त करते. भूतकाळात रमताना माहेरची आठवणही तिला छळते. 'आरक्षण', 'पिंपळवृक्ष', 'डियर सिस्टर' यासारख्या कवितेतून ती माहेरच्या वातावरणात जाऊन येते.

विविध रचनाबंध हाताळण्याची आवड असल्याने गझल हा रचनाबंध आत्मसात् करण्याचा प्रयत्न केला आहे. रचनाकौशल्य साधत असले तरी पूर्णतः कलाटणी देणारी गझल लिहिण्याचा प्रयत्न अजूनही चालू आहेत. नाविन्याची आवड आणि लेखनातील सातत्य यामुळे त्यातही तिला यश मिळेलच. एका गझलमध्ये ती म्हणते.

*तारकांचा गाव आता देतो 'प्रभा' आमंत्रणे*
*शुभ्र साध्या भावनांचे लेऊन आले चांदणे.*

प्रभाच्या प्रेमकवितांनी या कवितासंग्रहाला नितांत सुंदर आणि रमणीय बनविले आहे. अवखळ किंवा उथळ प्रेम नसून समर्पणातील संयमित प्रेम पण तिच्या स्पष्ट शैलीतून व्यक्त झाले आहे. प्रेम हा तिच्या जगण्याचा पाया आहे. तो आत्मिक सुसंवाद तिच्या प्रेमकवितांमधून सहज जाणवत राहतो. 'सत्यमेव' या कवितेत ती म्हणते

*तुझे नाव, मध्यान्हीच्या सूर्यप्रकाशासारखे*
*प्रखर आणि सत्यमेव ।*

प्रभाच्या प्रेमकवितांमधून प्रेम आणि फक्त प्रेमच व्यक्त होते; पण कधीतरी 'नियम' सारख्या कवितेत ती म्हणते-

*त्या साऱ्या अपमानित क्षणांची झाली आहेत उग्र दर्पाची फुले ।*

*आता हा पुष्पगुच्छ आणि त्याचा दर्प तुला नाकारता येणार नाही.*

पतीपत्नीमध्ये असणारा सुसंवाद आणि विसंवाद दोन्हींचे सहजसुंदर चित्रही तिच्या 'तह' आणि 'वसंत' सारख्या कवितांमधून उमटते.

फुलाचे आणि सुगंधाचे वेड अनेक कवितांमधून आढळते. तर मैत्री आणि मैत्रिणींचं जीवनातले स्थानही कवितांमधून ती व्यक्त करते. गझल व गेय, लयीतल्या कविता तिने लिहिल्या असल्या तरी मुक्तछंद अत्यंत प्रभावीरीतीने ती हाताळते. मुक्तछंदातली कविता तिची अस्सल व अधिक प्रामाणिक वाटते.

'मृगचांदणी' ही तेजस्वी असते. अनेक तारकासमूहात ठळकपणाने लक्ष वेधून घेते; तसा हा संग्रहही सहज लक्ष वेधून घेतो. पण तेजस्वी चांदणी जशी निरखतो तशा या कविताही मुळातून निरखायला हव्यात, वाचायला हव्यात. मृगाच्या कस्तुरीचा सुगंधही हिच्या कवितांना लाभला आहे; हे निश्चित ! व्यासंग आणि नाविन्याची ओढ असणाऱ्या या कवयित्रीच्या पुढील वाटचालीला हार्दिक शुभेच्छा !

❖❖❖

**'मृगचांदणी'** प्रभा सोनवणे,
स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे
पृष्ठे डेमी ८०, मूल्य रु. ६०/-

ज्योत्स्ना चांदगुडे
प्रसाद निवास, आनंद कॉलनी
वारजे, पुणे ४११ ०५२.
मो.: ९४०३३५७४६०

---

## लेखकांना विनंती

१) लेख कागदाच्या एका बाजूलाच लिहावेत.
२) सुवाच्य अक्षर असावे; किंवा टंकमुद्रित करून पाठवावेत.
३) लिखाणासोबत सदर लेख अन्यत्र प्रसिद्ध झाला नसल्याचे पत्र जोडावे.
४) लेखाबाबत पत्रव्यवहार करू नये.
५) प्रसिद्धीयोग्य लेखाबाबत संपादक संपर्क साधतील.



अनुक्रमणिका

# सहजसुंदर नितळ शैलीचा निर्मळ 'सहवास'

मल्हार अरणकल्ले

'दुर्दम्य उत्साह व सर्जनशील जोष असलेल्या, परिवर्तनाच्या प्रक्रियेची प्रगल्भ जाण असलेल्या आणि मातीतून आलेल्या शहाणपणाची जोड असलेल्या तरुण काँग्रेस कार्यकर्त्याच्या-पुढाऱ्याच्या प्रवासाचा सहृदय आलेख' असे ज्यांच्या लेखनासंबंधी म्हटले गेले, ते आमदार यशवंतराव गडाख यांच्या 'अर्धविराम' या पुस्तकाने वाचकांच्या आणि तमाम राजकीय कार्यकर्त्यांच्या अपेक्षा उंचावल्या होत्या. त्याच्या प्रकाशनानंतर, म्हणजे मे, २००३ नंतर, सहा वर्षांनी 'सहवास' हे त्यांचेच दुसरे पुस्तक 'ऋतुरंग प्रकाशना'ने प्रकाशित केले आहे. पहिल्यावहिल्या पुस्तकलेखनानंतर श्री. गडाख यांनी अर्धविराम घेतला, हेच बरे झाले; आणि म्हणूनच दुसरा अस्सल ललित बाजाचा सहवास साहित्यप्रेमींना घडला. या निर्मळ ललित साहित्यकृतीबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन केले पाहिजे. ललित साहित्यात पुष्कळ वेळा अनुकरणाची मळलेली वाट आढळते. श्री. गडाख यांचे हे लेखन त्याला अपवाद आहे; कारण या लेखनात जागोजागी त्यांची स्वतःची शैली दिसते. या अर्थानेही हे लेखन निर्मळ आहे. झऱ्याचे पाणी जसा अंगभूत नितळपणा घेऊन झुळझुळत असते; तसे पुस्तकाच्या पानापानांतील शब्द निखळ चांदणे होऊन वाचकांच्या मनाला आल्हाद देतात. फुलाचा गंध वाऱ्याच्या लहरींचे पंख लावून स्वभावतः दरवळत राहतो; तसे श्री. गडाख यांच्या सहवासात आलेल्यांच्या समृद्ध मनांचे किती तरी उत्सव वाचकांना नातेसंबंधांचे, मैत्रीसंबंधांचे लोभस अर्थ सांगतात.

'वयाची साठ वर्षं होऊन गेली. यश आले; तसेच अपयशही. काही मिळवलं; काही गमावलं. प्रसंगी दोन हात करावे लागले. उन्मळून पडावं, अशी वादळंही आली; परंतु मी टिकून राहिलो, कारण बालपणापासूनच माझी मुळं माणसांमध्ये पक्की रुजली आहेत. गावातल्या झाडाझुडपांत, सोनईची लोकमाता कौतुकी व तिच्या काठावरील मंदिरा-राउळांत आणि साध्यासुध्या माणसांत, पुस्तकांत, गाण्यांत माझा जीव जडला आहे...' श्री. गडाख यांच्या 'अर्धविराम' मधील हे मनोगतच (पान : ७-८) पुष्कळ आश्वासक आहे. जो संवेदनशील माणूस भोवतीच्या निसर्गाशी, झाडाझुडपांशी आणि माणसांच्या आतील आवाजांशी पूर्णतः विरघळून समरसून गेला आहे, तो सर्जनशील नसता, तरच नवल ! म्हणूनच त्यांना आईच्या सावलीतील दाट माया दिसते, धाकट्या पातीचा भक्कम आधार त्यांच्या लढण्याला बळ देतो, निर्व्याज मैत्रीचे आभाळ त्यांच्या कर्तृत्वाला नवी गवसणी घालते, राजकारण-समाजकारण यांतील सुसंस्कृतपणा-उमदेपणा त्यांना अनुभवता येतो; आणि तो मोठा ऐवज असल्याची कृतार्थ जाणीव होते. सहजीवनाच्या आरशात त्यांना जे दिसले, ते ते त्यांनी कमालीच्या सच्चेपणाने लिहिले आहे. मनाची धाव किती क्षितिजे ओलांडून जाऊ शकते, त्याचे मनोरम दर्शन 'आम्ही दोघे' या टिपणात घडते. निसर्ग वाचण्याचा त्यांना विलक्षण लळाच आहे. आठवणींचे ढग दाटून आले, की त्यांच्या 'मनातला पाऊस' स्वतःच चिंब होत कोसळू लागतो. जन्मभूमीतील कौतुकी नदी तर त्यांच्या मनात सदोदित वाहतच असावी जणू ! गावाकडील दिवसांच्या किती तरी संदर्भातनूच कौतुकीचे पाणी खेळत असते. ('गावाकडच्या दिवसां'च्या आठवणी जागविताना श्री. गडाख यांनी म्हटले आहे : 'ती कौतुकी, ते वाळू पात्र, ती पिढी. ते समाजजीवन आता राहिले नाही. आहेत त्या फक्त आठवणी. त्या रम्य आठवणींवर आता जगायचे आहे. आयुष्याची संध्याकाळ घालवायची आहे; आणि शेवटच्या क्षणी सोबतीला कौतुकी आहेच' (पान :५६) ... 'कौतुकी नदी आता शोधावी लागते. वाळू तर शिल्लकच राहिली नाही...' (पान : ६८). अनेक गावांतील नद्या आज हरवल्या आहेत. शेते तहानलेली आहेत. माळराने भकास झाली आहेत आणि रस्ते धुळीने भरून नेले आहेत. गावातील या हरवलेपणातून आलेली अस्वस्थता श्री. गडाख यांनी साध्या आणि कमीत कमी

शब्दांत समर्थपणाने मांडली आहे. ज्याने भोवताल अंगाभोवती एवढा लपेटून घेतलेला आहे, त्यालाच ही कातरता जाणवू शकते.)

हे लेखन झाले, ते मुळात दिवाळी अंकांच्या निमित्ताने. श्री. गडाख यांच्यांतील लेखकाचा शोध त्यांचे कविमित्र आणि प्रकाशक अरुण शेवते यांनी घेतला. दोघांचे मैत्र खूप जुने. तेव्हा शेवते पत्रकार होते आणि श्री. गडाख राजकारणात आलेले युवक. स्नेह जुळला. वाढत गेला. मुक्कामाची गावे बदलली. भूमिकाही बदलल्या. शेवते यांनी आपल्या 'ऋतुरंग' या दिवाळी अंकासाठी श्री. गडाख यांना लिहिते केले. त्यांच्या शब्दांतून आलेला 'मनातील पाऊस' 'हंस'च्या आनंद अंतरकरांना भिजवून गेला; आणि पुढच्या दिवाळी अंकात 'हंस' मध्ये 'आम्ही दोघे' चा सारीपाट मांडला गेला. या उभय संपादकद्वयांचे त्यासाठी मनःपूर्वक अभिनंदन. राजकारण-समाजकारण यांच्या रेट्यात गुदमरलेला ललित लेखक त्यांनी समर्थपणाने उभा केला.

'सहवास' मध्ये एकूण तेरा लेख आहेत. २००६ ते २००८ या वर्षांतील दिवाळी अंकांसाठी ते लिहिलेले आहेत. काही लेख थोडे पुढे-मागे आणि स्वतंत्रपणे लिहिलेले आहेत. त्यांपैकी सात व्यक्तिचित्रे, तीन निसर्गवर्णनपर लेख आणि तीन आत्मकथने, पत्रव्यवहार, आठवणी यांचे पदर उलगडून दाखविणारी टिपणे आहेत. निसर्ग आणि माणसे यांच्या भावना वाचण्याची विलक्षण क्षमता श्री. गडाख यांच्याकडे आहे. त्यामुळे, त्यांच्या प्रतिपादनात चित्रदर्शीपणा, नेमकेपणा आणि बारकावे टिपण्याची हातोटी आहे. सहज लिहिता लिहाता ते काही क्षणात वाचकांना हळुवार भावनांशी घट्ट बांधून ठेवतात. 'आम्ही दोघे' या ललित लेखात जागोजागी याचा प्रत्यय येतो. "...मधल्या काळात आमच्यात दुरावाच होता. आम्ही एकमेकांशी बोलत नव्हतो. म्हणजे मीच बोलत नव्हतो. मला तिनं तांब्या भरून दिलेलं पाणी किंवा जेवायला वाढलेलं देखील आवडत नसे. जेवणाचं ताट कधी कधी तिच्या अंगावर भिरकवायचो." (पान : ३६) "शून्यातून सारे वैभव निर्माण करताना झालेला संघर्ष, प्रचंड कष्ट, त्यात आलेले यशापयश, पाहिलेली-भोगलेली गरीवी, अनेक सुखदुःखाचे क्षण. या साऱ्या क्षणांची-घटनांची ती साक्षीदार होती. एक मूक साक्षीदार. गेल्या चाळीस-पन्नास वर्षांच्या सहजीवनाच्या खडतर प्रवासात ती खाचखळग्यांत अनेकदा ठेचाळली, रक्ताळली. या साऱ्या वाटचालीत माझे तिच्याकडे दुर्लक्ष झाले. माझ्याकडून तिची अवहेलना झाली; पण तिने कधी कुरकूर केली नाही." (पान : ३२) त्यांचा विवाह १९६१ मध्ये झाला. त्यानंतर १९७४ मध्ये ते प्रथमच एकत्रित पुण्याला आले आणि बालगंधर्व रंगमंदिरात पहिले नाटक पाहिले. नंतर उभयतांनी जगभरात प्रवास केला. ही माहिती पारदर्शीपणा, प्रामाणिकपणा आणि कबुली देण्याचा उमदेपणा असल्याशिवाय कोणीच सांगू शकणार नाही. कौटुंबिक चढ-उतारांचा हा हृद्य आलेख कमालीच्या तरलतेने त्यांनी लिहिला आहे. "घरातील लक्ष्मी औक्षण करताना आपल्या लुगड्याचा पदर निरांजनाभोवती धरते. दिवा वाऱ्याने विझू नये म्हणून जीव धोक्यात घालून ती हे करीत असते. तसे कितीही कठीण प्रसंग आले, मोठा झंझावात आला, वारे-वादळे आली, तरी सर्व घराला मायेच्या पदराखाली झाकून घेऊन मायेची ऊब ती देत आली आहे. अशा मागील तीन-चार दशकांची स्त्रियांची पिढी आता संपत चालली आहे." (पान : ४४) साध्या-सोप्या शब्दांतील हे उल्लेख वाचताना वाचकांच्या डोळ्यांपुढे औक्षण करणाऱ्या निरांजनाचे तबक धरणारे ते मायेचे हात आल्याशिवाय राहत नाहीत.

पावसाच्या आठवणींनी भिजून गेला नाही, असा माणूस विरळाच. श्री. गडाख यांच्यातील ललित लेखक या चिंवपणानेच लिहिता झाला. 'मनातला पाऊस' हा त्यांचा पहिला ललित लेख. 'ऋतुरंग' च्या दिवाळी अंकासाठी अरुण शेवते यांनी तो लिहून घेतला. दिल्लीतील तीन-चार दिवसांच्या निवांत मुक्कामात श्री. गडाख यांनी तो लिहिला. धुक्याच्या पडद्याने लपेटलेला निसर्ग, पाझरणारे डोंगर, धबधबे यांच्या आठवणी त्यांनी वाहत्या पाण्यासारख्या आत्मीयतेने सांगितल्या आहेत. कॉर्बेट पार्कमधील निसर्ग टिपताना त्यांनी म्हटले आहे : "रातकिड्यांचे आवाज, प्राण्यांचे आवाज, भयाण शांतता, सगळीकडं पसरणारं धुकं, दवबिंदू; सगळं जंगलच ओलंचिंब. त्यातून येणार गवताचा, फुलांचा रानवट वास." (पान : ७५). मेळघाटातील कोलखास रेस्टहाऊसचे वर्णन तर चित्रदर्शीच आहे. (मुखपृष्ठावर

याच शब्दांचे हिरवेगार चित्र सतीश भावसार यांनी रेखाटले आहे.) एक पौर्णिमा श्री. गडाख यांनी तेथे अनुभवली. ते म्हणतात : मंद असे थंड वारे होते. रात्र वाढायला लागली होती; आणि निसर्गाचा चमत्कार अचानक बघायला मिळाला. समोरच्या घनदाट जंगलातून चंद्र वर येत होता. सगळीकडं चांदणंच चांदणं. खाली खोल खोल दरीत वाहणारं नदीचं संथ पाणी. सगळी नदी चंद्रप्रकाशात न्हाऊन निघाली होती-- आणि जंगलही. झाडांच्या सावल्या नदीच्या पाण्यात स्पष्ट दिसत होत्या. त्यांच्या पत्नी शारदाबाई म्हणाल्या : 'चंद्र पाण्यात उतरताना पाहायला मिळाला.' (हा संवादही या वर्णनाचे चित्रदर्शीपण आणखी खुलवितो.) (पान : ७५) लहानपणी उन्हाळ्यात, मोकळ्या रानात खळ्यावर झोपताना पाहिलेले आभाळ त्यांना नागझिऱ्याला भेटले. ''समोर तळ्याचं निळशार पाणी, त्यात पडलेलं ताऱ्यांचं प्रतिबिंब. सगळं आकाश जणू ताऱ्यांनी भरून गेलेलं; आणि ते तळ्यात उतरलं होतं. जंगलातली ती नीरव शांतता. तीन-चार तास पूर्वेकडून पश्चिमेकडं निघालेला तो ताऱ्यांचा छबिना पाहताना भान हरपून गेलं.'' (पान ७७). गोव्याला जाताना आंबोलीच्या पावसाने त्यांना असेच लपेटून घेतले आणि बांधून ठेवले. त्यांनी लिहिले आहे : सगळा डोंगर पाझरत होता. थोड्या थोड्याशा अंतरावर धवधवे, काही लहान, काही गोठे. खाली दरीत लांबवर पसरलेलं जंगल. दरीतून वर येणारे ढग. सारं कसं पावसाळलेलं. वाचकांच्या मनावरही या 'पावसाळलेपणा'चा जबरदस्त अंमल होतो; आणि मनाच्या निसर्गाचे डोंगरकडे पाझरू लागतात. याच लेखनात ते एक जुना रिवाजही सांगतात. तो आहे पाऊस पोळण्याचा. कोळशाचा विस्तव करायचा, त्याला हळद-कुंकू वाहायचं, देवाची प्रार्थना करायची आणि म्हणायचं: 'पावसा, आता निघून जा.'

'सुसंस्कृत नेतृत्व' (सुशीलकुमार शिंदे), 'सरपंच ते मुख्यमंत्री' (विलासराव देशमुख), 'प्रतिनिधी' (अजित पवार) ही श्री. गडाख यांच्या राजकीय प्रवासातील व्यक्तिचित्रे आहेत. राजकारण-समाजकारण यांत ते सुमारे चार दशकांहून अधिक काळ आहेत. जुन्या-नव्या पिढीतील राजकीय मंच त्यांना जवळून पाहता आला. या वाटचालीत त्यांना भेटलेल्या माणसांचे वर्णन त्यांनी 'अर्धविराम' मध्ये केले आहे. त्यांनी म्हटले आहे :

माणसं खूप पाहिली.
माणसं व्यवहारावर उतरताना पाहिली,
पाठ दाखवून पळ काढताना पाहिली,
ऐन वेळी एकटं सोडून जाताना पाहिली,
माणसं खूप पाहिली.
माणसं विन्मुख होताना पाहिली,
ओळख विसरून,
'तू कोण ?' म्हणत उलटताना पाहिली,
माणसं खूप पाहिली...!

माणसांचे एवढे नमुने पाहूनही, त्यांच्याविषयीची कटुता त्यांच्या निवेदनात जराही डोकावत नाही. असा उमदेपणा अभावाने आढळतो.

'मित्र' (अरुण शेवते) हेही असेच हृद्य व्यक्तिचित्र आहे. त्यांनी प्रकाशित केलेल्या कविता-संग्रहाच्या काही प्रती जिल्हा परिषदेने घ्याव्यात, या उद्देशाने प्रथम परिचय झाला, पत्रकारितेच्या निमित्ताने तो घट्ट होत गेला. याच काळात नगरला जिल्ह्यातील लेखक, कवी, कलावंत यांचा सत्कार जिल्हा परिषदेने करावा, अशी सूचना शेवते यांनी केली आणि माधव गडकरी, सुरेश भट, व्यंकटेश माडगूळकर, मधु मंगेश कर्णिक, सुभाष भेंडे यांसारख्यांच्या उपस्थितीत हा कार्यक्रम पारही पाडला. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचा घाट नगरला घालावा, यामागेही शेवतेच होते. तेथेही हाच अनुभव. ती खिंड शेवते यांनी समर्थपणाने लढविली. पुढे शेवते मुंबईला गेले; पण उभयतांतील स्नेह तसूनेही कमी झाला नाही; उलट वाढतच राहिला. श्री. गडाख यांना भाचे-भाच्या खूप. त्यांच्या लग्नात ते कधीच मामा म्हणून मागे उभे राहिले नाहीत, ते काम धाकट्या भावाने केले; पण शेवते यांच्या लग्नात ते मामा म्हणून मागे उभे राहिले. माणसे जोडण्याची आणि ती टिकविण्याची ही वृत्तीच त्यांना खूप काही देऊन गेली आहे. श्री. गडाख यांनी या मित्रासंबंधी लिहिले आहे : माझ्या भोवतीच्या रिंगणवाल्यांकडून त्यांची अवहेलना झाली. समज-गैरसमज झाले. मैत्रीला प्रचंड धक्के बसले; पण आमची मैत्री प्रामाणिक आहे. स्वार्थ, देवाणघेवाण, अपेक्षा, खोटी सहानुभुती यांपासून ती दूर आहे. (पान : ८९) 'पत्रसंवाद' या टिपणातून श्री. गडाख यांनी कवी सुरेश

भट यांचे व्यक्तिचित्र उभे केले आहे. त्यांच्यातील बेहोश कवी आणि सच्च्या दिलाचा मित्र ही लोभस रूपे त्यांना फारच भावली. नगर हा राजकीयदृष्ट्या जागरूक जिल्हा. सहकारात अग्रेसर. खूप कर्तृत्ववान माणसे या जिल्ह्यात निर्माण झाली. 'धुरंधर राजकारणी असूनही त्यांना मानवी चेहरा व मन होते,' असे निरीक्षण श्री. गडाख यांनी नोंदविले आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला या 'ऐवजा'ने संयमित आणि परिपक्व आकार दिला आहे. श्री. गडाख यांच्या सामाजिक-राजकीय वाटचालीत हे संस्कार ठिकठिकाणी आढळतात.

ईशान्येकडील राज्यांतील निसर्गाची चित्रमय सफर घडविणारा 'स्वप्नभूमी' हा लेख आवर्जून अनुभवावा असा आहे. 'सगळा अरुणाचल प्रदेश म्हणजे अवगुंठित स्वर्ग. पहाटेने प्रकाशित झालेल्या पहाडांचा प्रदेश. धावणारे झरे, लपेटणारे धुके, गरजणारे धवधवे, निळ्याभोर पाण्याची निसर्गनिर्मित शांत तळी...' अशी लोभस वर्णने वाचकांना गुंतवून ठेवतात. 'संस्मरण' हाही याच तरलतेचा अनुपम अनुभव देणारा ललित लेख. 'एखाद्या प्रतिभावान लेखकाची आठवण म्हणून एक संपूर्ण गाव स्मारकरूपाने जपणे, हे सुसंस्कृतपणाचे दुर्मिळ उदाहरण आहे,' असा दाखला स्टॅटफर्डच्या काठावरील शेक्सपिअरचे गाव पाहताना त्यांनी दिला आहे. 'सदाबहार तजेला आणि चमक असलेली हिरव्यागार पानांची वृक्षराजी अन् त्यांच्यात मधूनच नाजूक नक्षी असल्यासारखी विविधरंगी फुलझाडे ! सावलीलाही पानांफुलांचा गंध यावा, असे वातावरण. व्यवहारी जगापासून अलिप्त असलेले प्रसन्नतेचे ते जणू बेट होते.' (पान : १७४). स्टॅटफर्डचे हे वर्णन वाचकांना त्या भूमीचा स्पर्श झाल्याची मनस्वी अनुभूती देते. नगरला २००५ मध्ये 'जागतिक मराठी अकादमी' चे अधिवेशन झाले होते. सोनाईच्या 'मुळा एज्युकेशन सोसायटी'कडे त्याच्या संयोजनाची जबाबदारी होती. कतार या मध्यपूर्वेकडील छोट्या आखाती देशाच्या; तसेच लंडनच्या महाराष्ट्र मंडळाच्या कार्यक्रमांना उपस्थित राहण्याची संधी श्री. गडाख यांना मिळाली. त्याचाही 'संस्मरणा'त उल्लेख आहे.

मनःपटलावर उमटलेल्या अनेकविध प्रसंगांचे भावस्पर्शी चित्र त्यांच्या या शैलीतून साकारले आहे. ही लेखनशैली अकृत्रिम आहे. जे सांगावयाचे, त्यातील सोपेपणा शब्दांना अलंकारांसारखा लगडलेला आहे. मुळातील वस्तूचे सौंदर्य अधिक खुलावे, म्हणून अलंकरण केले जाते; मात्र काही वेळा मूळ वस्तूच एवढी सुंदर असते, की अलंकरण केल्याने तिचे सौंदर्य तर वर्धिष्णू होतेच; शिवाय अलंकारांनाही वेगळी झळाळी येते. ही शैली विलक्षण संवादी आणि प्रवाही आहे. वाचक चटकन तिच्याशी समरस होतो; कारण ती त्याच्याशी साध्या-सोप्या सहजभावाने बोलू लागते. आपल्या आशयावरोबर त्याला प्रवाहाच्या वाहत्या गतीने घेऊन जाते. तरल संवेदनशक्ती असणारा लिहिता होतो, असे जसे म्हटले जाते (आणि ते खरेही आहे); तसेच ज्याच्याकडे तरलता तर आहेच; पण प्रसंगांतील, दृश्य विषयांतील चित्रमयता नजरबंद करण्याची दुर्मिळ क्षमताही ज्याच्या प्रतिभेला चंद्रासवे पाझरणाऱ्या चांदण्यासारखी लाभलेली आहे, त्याच्या लेखनात खिळवून ठेवणारे कवडसे जागोजागी भेटत राहतात. श्री. गडाख यांच्या लेखनात हा प्रत्यय सतत येतो. केवळ दिवाळी अंकांच्या निमित्ताने लिहिण्याची सवय सोडून, श्री. गडाख यांनी आता लेखनात सातत्य आणावयास हवे. त्यांच्यातील ललित लेखकाचा आवाका मोठा आहे. अनुभवांचा एवढा विस्तृत पैस लाभलेल्या त्यांच्या सारख्यांनी अधिक लिहिते झालेच पाहिजे.

उत्कृष्ट निर्मितीबद्दल प्रकाशकांचे मनःपूर्वक अभिनंदन !

❖❖❖

**मल्हार अरणकल्ले**
१०/२, गुरुजन सोसायटी,
कोथरूड, पुणे ४११ ०२९.
दूरध्वनी : (घर) ०२०-२५३८६५४४.
मोबाईल : ९८८१०९९००७

('**सहवास**' : लेखक : यशवंतराव गडाख.
ऋतुरंग प्रकाशन, मुंबई.
पृष्ठे : १७५, किंमत : १६० रुपये)



अनुक्रमणिका







## निवडक नवे...

परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी
विशेष उल्लेखनीय ग्रंथांचा
परिचय करून देणारे सदर



**गंगा आये कहाँ से... गुलजार : एका दिग्दर्शकाचा प्रवास :**

मानवी नातेसंबंधांचे चक्रव्यूह भेदणारा मनस्वी चित्रपट दिग्दर्शक गुलजार यांच्या बहुआयामी कलासक्त व्यक्तिमत्त्वाचा शोध घेणारा हा ग्रंथ प्रसिद्ध चित्रपटसमीक्षक श्री. विजय पाडळकर यांनी आस्वादक समीक्षेच्या राजमार्गावरून शब्दबद्ध केला आहे. मॅजेस्टिक प्रकाशनने ह्या ग्रंथाला गहिरा आकार दिला आहे. हा ग्रंथ एकूण अंतर्बाह्य सुंदर झाला आहे. कवी अरुण शेवते यांची यामागे प्रेरणा असल्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख आहे.

गुलजार यांनी आपल्या दिग्दर्शनाच्या सहस्रनेत्रांनी माणसामाणसांमधल्या नातेसंबंधाचे चक्रव्यूह पाहिले आहे. धर्म, समाज, संस्कृती यांना मान्य नसलेली नाती आणि मनाला भावणारी नाती यांनी संघर्षमय झालेले माणसाचे जीवन एका जीवघेण्या घुसमटीतून युगायुगांचा प्रवास करीत आहेत. 'मौसम' मध्ये एकमेकांचा शोध घेणारे बाप आणि मुलगी, 'इजाजत' मधील पती-पत्नीच्या नात्यात प्रवेशणारी प्रेयसी, घर आणि शाळेच्या जगापेक्षा वेगळे जगाचे पुस्तक वाचणारा 'किताब'चा नायक किशोरवयीन मुलगा, बोलण्याच्या आणि ऐकण्याच्या पलीकडे साधलेला नातेसंबंध दर्शविण्याची केलेली गहिरी 'कोशीश', मीरा के प्रभूचे अशरीरी नाते, पत्नीच्या रुपाने जीवनात 'आँधी'चा प्रवेश सांभाळताना शाश्वत नाते सापडलेला पती... एक ना अनेक-सोळा चित्रपटांच्या माध्यमातून हा हृद्य शोध घेतला आहे. चित्रप्रतिमा, संगीतप्रतिमा, नृत्यप्रतिमा यांच्यावरोबर नेमका संवाद साधणारी पटकथा, गीतरचना, कलाकारांची नेमकी निवड, व्यासंगी कथालेखक अशा अनेक मुखांनी ही गंगा सागराला मिळते. एक विदग्ध चित्रपटनिर्मिती होते.

अमूर्ताला मूर्तरूप देणारे असे बहुआयामी गुलजार श्री. विजय पाडळकर यांनी या ग्रंथात प्रकट केले आहे. गुलजारांच्या संवादाची जादू, दिग्दर्शनाचे बारकावे, संगीताच्या अशरीरी स्वरांना प्रकट करणारे गुलजारांचे गीतबद्ध झालेले शब्द आणि सिनेकॅमेऱ्याच्या डोळ्यांनी जीवनाचे हे चक्रव्यूह गहिऱ्या प्रसंगनिर्मितींनी हळुवारपणे उलगडून दाखविणारे कवी गुलजार पदोपदी दिसतात. बिमलदा आणि हृषिदा यांच्या कलामार्गाला 'संपूर्ण'त्वा कडे नेणारे गुलजार या ग्रंथात प्रकट झालेले दिसतील.

सहृदय चित्रपट समीक्षक श्री. विजय पाडळकर यांच्या ह्या अनोख्या कलाप्रवासाचे रूप दर्यावदी कोलंबसाच्या जिद्दीचे आणि निष्ठेचे प्रतीक आहे.

एका कलेचा, कलाकाराचा आणि त्याबरोबर जीवनाच्या जटिलतेला-प्रमेयांना-कलेच्या मनोरम प्रेक्षकाभिमुख रूपसिद्धीचा हा काव्यमय प्रवास आहे.

(**गंगा आये कहाँ से...** गुलजार : एका दिग्दर्शकाचा प्रवास : लेखक - विजय पाडळकर, प्रकाशक - मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, सन २००८, किंमत रु. २५०/-, पृष्ठे १९६.)

**विद्रोह, विज्ञान आणि विश्वात्मकता :**

ज्येष्ठ साहित्यिक डॉ. गंगाधर पानतावणे यांनी विविध ठिकाणी केलेल्या अध्यक्षीय- उद्घाटकीय भाषणांचे हे संकलन आहे. मात्र ही निव्वळ पुस्तकी भाषणं नाहीत. त्यामध्ये परिवर्तनाची नांदी आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आखून दिलेल्या मार्गाने वाटचाल करताना समजाशास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र आदि विषयातील सैद्धांतिक पैलूंची




मांडणी करण्याचा प्रयत्न यामधून दिसतो. यामध्ये इतिहास, संस्कृतीची मीमांसा आहे. माणसामधून माणुसकी वजा करणाऱ्या हेकेखोर व्यवस्थेची चिकित्सा आहे. दलित साहित्य-सामाजिक आणि सांस्कृतिकता, परिवर्तनवादी विचार हा मूल्यनिर्मितीची विचार, आंबेडकर-फुले तत्त्वज्ञान स्वयंपूर्ण, विचारप्रधान साहित्य आणि नवी वाचनसंस्कृती आदी तेरा विषयांवरील भाषणांचे महेंद्र गायकवाड यांनी केलेले हे संकलन विचारप्रवण करणारे ठरावे.

(**विद्रोह, विज्ञान आणि विश्वात्मकता**- संपादन - महेंद्र गायकवाड, संघर्ष प्रकाशन, नागपूर, पृष्ठे- १७६, किंमत - १५० रुपये)

**अरुणा ढेरे : शाश्वताची शिदोरी**




मराठी ललित गद्याच्या प्रांगणात डॉ.अरुणा ढेरे यांच्या लेखनाचे योगदान बहुपेडी स्वरुपाचे आहे. त्यांची सृजनशीलता, वाङ्मयीन, सांस्कृतिक पर्यावरणाशी असलेली अभ्यासपूर्ण जवळीक यामुळे त्यांचे लेखन सकस आणि महत्त्वपूर्ण ठरते. या संग्रहात त्यांच्या सात संग्रहांमधील त्यांच्या ललितगद्य लेखनाची प्रकृती रेखांकित करणाऱ्या लेखांचे संकलन डॉ. वीणा देव यांनी केले आहे. लावण्ययात्रा, रुपोत्सव, कवितेच्या शोधात, मनातलं आभाळ, नव्या-जुन्याच्या काठावरती, अर्ध्या वाटेवर आणि माणूस आणि माती हे सात लेख सर्वार्थाने लेखिकेच्या समृद्ध व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडवितात. त्यांचे जगण्यावर असलेले प्रेम ललित गद्याच्या लेखनाला पोषक ठरले आहे. 'मनातलं आभाळ' सारख्या लेखात स्वतःच्या आभाळाशी असलेल्या नात्याचा शोध घेता घेता काही प्रतिभावंतांच्या आभाळाच्या आकलनाचे स्मरण त्यांना होते. विविध दृष्टिकोनांच्या मेळातून ललित लेख उलगडत जातो; आणि आत्मजाणिवेच्या शोधापाशी येऊन थांबतो. यामध्ये निवडलेला प्रत्येक लेख अशा जाणिवेच्या स्पर्शाने उठावदार झाला आहे. त्यामुळेच ही 'शाश्वताची शिदोरी' खऱ्या अर्थानं वाचकांना तृप्त करणारी ठरावी.

(**शाश्वताची शिदोरी**- संपादनः डॉ. वीणा देव, अभिजीत प्रकाशन, पृष्ठे - २६८, किंमत १४० रुपये)

**समाजजीवनातील तुकाराम :**




संत तुकारामांचे काव्य गेली चार शतके मराठी मनांवर अखंडितपणे मोहिनी टिकवून आहे. त्यामध्ये मराठी माणसाचे मन, स्वभाव, जगण्याचे विविध संदर्भ आहेत. पण त्याचबरोबर लोकसंस्कृती, परंपरा, आचार-विचार-नीतिसंकल्पना यांनी बनलेलं समाजशास्त्रही आहे. डॉ. तानाजी राऊ पाटील यांनी 'तुकारामांच्या कवितेतील लौकिक समाजजीवनाचे चित्रण' या शोधप्रकल्पाच्या निमित्ताने या सामाजिक जाणिवेचा वेध घेण्याचा केलेला हा एक अत्यंत अभ्यासपूर्ण, स्तुत्य प्रयत्न आहे. तुकारामांच्या कवितेतून व्यक्त होणारे दैनंदिन जीवनचे आचारसूत्र, व्यक्ती-समाजाच्या जगण्याच्या दिशा, समाजातील नीतीनियमांचे संकेत यामधून समाजजीवनाचे व्यापक चित्र स्पष्ट होत जाते. यातून व्यक्त होणारी नैतिक मूल्यांची विचारसूत्रे, आणि सामाजिक दृष्टी हाच या प्रबंधाचा गाभा आहे. प्रा. पाटील यांनी तुकोबांचा समाजसमीक्षक, समाजशिक्षक आणि समाज सुधारक या नात्यांनी विचार केलेला आहे. लोकांशी असलेली बांधिलकी जपत त्यांच्याशी समरस होणारे तुकोबा तरीही आपला 'लोकोत्तर' स्वभाव कसा टिकवून ठेवतात. हेही डॉ. पाटील यांनी समर्थपणे दाखविले आहे. तुकोबांच्या कार्याची मूल्यदृष्टीतून केलेली ही समाजसमीक्षा त्यांची सामाजिक प्रतिमा अधिकच घट्ट करणारी आहे.

(समाजजीवनातील तुकाराम, डॉ. तानाजी राऊ पाटील, पद्मगंधा प्रकाशन, पृष्ठे-१९२, किंमत-१६० रु.)

**जीवन त्यांना कळले हो ! :**




कथाकार आणि कादंबरीकार म्हणून मराठी साहित्यात आपली वैशिष्ट्यपूर्ण नाममुद्रा कोरणारे जुने बुजुर्ग लेखक- डॉ. राजेंद्र बनहट्टी यांचे हे दोन अंकी नाटक एका वेगळ्या कथावस्तूने लक्ष वेधून घेते. माणसाची दुर्दम्य जीवनेच्छा त्याच्या अपंगात्वावर मात करते. परंतु ही प्रभावी जीवनेच्छा, त्याला प्राप्त झालेले अपंगत्व, दुर्धर आजारही मनाच्या शक्तीने बरा होतो. जीवनाकडे पाहताना सकारात्मक आणि आनंदी वृत्ती असेल तर दुर्धर आजारही बरे होतात. मात्र जीवनाच्या प्रत्येक्ष क्षणाचा आणि कणाचा आनंद घेण्याची वृत्ती पाहिजे. अशा नव्वदीतल्या अप्पासाहेब नावाच्या एका रसिक आनंदी वृद्धाची ही कहाणी दोन अंकात आणि नऊ दृश्यांमधून बेतली आहे. जीवनाचे केवळ पंधरा दिवस राहिले असल्याचे डॉक्टरांनी सांगितल्यावर धास्तावलेल्या आणि जिवापाड काळजी घेतो असे दाखविणाऱ्या, लेक-सुनेचे वेगडी प्रेम पदोपदी उघड होते. भेटायला आलेला मित्र मरणाच्या चाहुलीने अर्धमेला झालेला. मरायला टेकलेल्या माणसांचे मन आणि शरीर औषधांच्या वासाने उबगून मरतात. त्यांना सुखाने मरू द्यावे ही अप्पासाहेबांची माफक अपेक्षा. एका क्षणी त्यांच्या प्रयत्नांना त्यांचे शरीर साथ देते. 'पॅरलाइज्' झालेल्या पायात अनामिक शक्तीने त्राण येतो. अप्पासाहेब पुन्हा हालचाल करू लागतात.

कादंबरीचा विषय असलेले हे नाटक आणि त्याची कथावस्तू रंगावृत्तीचा संस्कार होऊन कसे प्रयोगशील होईल; ते पाहणे रसिकांना आवडेल, अशी अपेक्षा निर्माण होते. (**'जीवन त्यांना कळले हो !'** नाटक-राजेंद्र बनहट्टी, पुष्पक प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती-१५ ऑगस्ट २००८, पृष्ठे ९६ डेमी, किंमत १०० रुपये)

❖❖❖

**(परीक्षण लेख : स्वाती महाळंक आणि डॉ. सु. प्र. कुलकर्णी)**

## महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेसंबंधी निवेदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेची सन २००१ पासून अमलात असलेली घटना पुनर्रचित करण्याचे काम सध्या चालू असून त्यासंदर्भात गेल्या वर्षभरात घटना समितीच्या पाच सभा आयोजित करण्यात आल्या होत्या. या सभांच्या द्वारे घटनेच्या संदर्भातील विशेष नोंदी संकलित करणे, कायदेशीर कागदपत्रांची जुळवाजुळव करणे, परिषदेच्या सभासदांशी पत्रव्यवहार करणे व त्यांच्याकडून सूचना मागवून घेणे. सभासदांनी पाठविलेल्या पत्रांचा परामर्श घेणे अशी काही प्राथमिक स्वरूपाची कामे हातावेगळी करण्यात आली आहेत.

साहित्य पत्रिकेच्या ऑक्टोबर ते डिसेंबर २००८ या कालावधीसाठी प्रकाशित झालेल्या अंक क्र. ३२७ मधून घटनेच्या संदर्भात एक निवेदनही देण्यात आले होते, हे आपणास माहीत असेलच. या निवेदनाद्वारे परिषदेच्या सभासदांकडून घटना दुरुस्ती संदर्भात सूचनाही मागविण्यात आल्या होत्या. सभासदांनीही आमच्या प्रयत्नांना चांगला प्रतिसाद देऊन आमचा उत्साह द्विगुणीत केलेला आहे. घटना समितीबरोबर राहून सभासदांनी घटनेच्या पुनर्रचनेच्या कामात आपला सहभाग दिला ही घटना, समितीच्या दृष्टीने समाधानाची बाब आहे.

परिषदेच्या सभासदांना या निवेदनाद्वारे पुन्हा एकदा सूचित करण्यात येत आहे की, परिषदेच्या विद्यमान घटनेतील 'उद्दिष्टे, नियम व उपनियम तसेच शाखांसंबंधींचे नियम या संदर्भात काही सूचना किंवा दुरुस्त्या सुचवायच्या असल्यास त्यांनी त्या पत्राद्वारे निमंत्रक, श्री. रत्नाकर कुलकर्णी, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे-३० यांच्याकडे दि. ३० एप्रिल२००९ पूर्वी पाठवाव्यात; ही विनंती.

आपले,

**रत्नाकर कुलकर्णी** (निमंत्रक) **राजा फडणीस** (अध्यक्ष)





अनुक्रमणिका

# अ. भा. मराठी साहित्य संमेलने (कालपट)

## संकलन - श्री. म. श्री. दीक्षित

| क्रम | सन | स्थळ | स्वागताध्यक्ष | अध्यक्ष | जन्म | मृत्यू |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | १८७८ | पुणे | -- | न्या. म. गो. रानडे | १८-१-१८४२ | १६-१-१९०१ |
| २. | १८८५ | पुणे | | कृष्णशास्त्री राजवाडे | १६-८-१८२० | ६-८-९०१ |
| ३. | १९०५ | सातारा | | र. पां. करंदीकर | २१-८-१८५७ | २४-४-१९३५ |
| ४. | १९०६ | पुणे | | गो. वा. कानिटकर | ९-१-१८५४ | ४-६-१९१८ |
| ५. | १९०७ | पुणे | | वि. मो. महाजनी | १०-११-१८५१ | १६-२-१९२३ |
| ६. | १९०८ | पुणे | वा. गो. आपटे | चिं. वि. वैद्य | १८-१०-१८६१ | २०-४-१९३८ |
| ७. | १९०९ | बडोदा | संपतराव गायकवाड | का. र. कीर्तिकर | २४-५-१८४९ | ९-५-१९१७ |
| ८. | १९१२ | अकोला | वि. मो. महाजनी | ह. ना. आपटे | ८-३-१८६४ | ३-३-१९१९ |
| ९. | १९१५ | मुंबई | भा. कृ. भाटवडेकर | गंगाधरराव पटवर्धन | ६-२-१८६६ | ११-१२-१९३९ |
| १०. | १९१७ | इंदूर | गोविंदराव मतकर | ग. ज. आगाशे | १३-९-१८५२ | १३-७-१९१९ |
| ११. | १९२१ | बडोदे | संपतराव गायकवाड | न. चिं. केळकर | २४-८-१८७२ | १४-१०-१९४७ |
| १२. | १९२६ | मुंबई | पु. वा. जोशी | मा. वि. किबे | ५-४-१८७७ | १२-१०-१९६३ |
| १३. | १९२७ | पुणे | न. चिं. केळकर | श्री. कृ. कोल्हटकर | २९-६-१९७१ | १-६-१९३४ |
| १४. | १९२८ | ग्वाल्हेर | चिं. वि. वैद्य | मा. श्री. अणे | २९-८-१८८० | २६-१-१९६८ |
| १५. | १९२९ | बेळगाव | अ. बा. लठ्ठे | शि. म. परांजपे | २७-६-१८६४ | २७-९-१९२९ |
| १६. | १९३० | मडगाव (गोवा) | शांबाराव सरदेसाई | वा. म. जोशी | २१-१-१८८२ | २०-७-१९४३ |
| १७. | १९३१ | हैद्राबाद | धुंडीराज बहादूर | श्री. व्यं. केतकर | २-२-१८८४ | १९-४-१९३७ |
| १८. | १९३२ | कोल्हापूर | द. भा. भोसले | सयाजीराव गायकवाड | १७-३-१८६३ | ६-२-१९३९ |
| १९. | १९३३ | नागपूर | भवानीशंकर नियोगी | कृ. प्र. खाडिल्कर | २३-११-१८७२ | २८-८-१९४८ |
| २०. | १९३४ | बडोदे | नानासाहेब शिंदे | ना. गो. चापेकर | ५-८-१८६९ | ५-३-१९६८ |
| २१. | १९३५ | इंदूर | विक्रमसिंह पवार | बाळासाहेब पंतप्रतिनिधी | २४-१०-१८६८ | १४-४-१९५१ |
| २२. | १९३६ | जळगाव | आनंदीबाई शिर्के | मा. त्रिं. पटवर्धन | २१-१-१८९४ | २९-११-१९३९ |
| २३. | १९३८ | मुंबई | मुकुंदराव जयकर | वि. दा. सावरकर | २८-५-१८८३ | २६-२-१९६६ |
| २४. | १९३९ | अहमदनगर | न. बा. देशमुख | द. वा. पोतदार | ५-८-१८९० | ९-१०-१९७९ |
| २५. | १९४० | रत्नागिरी | भा. वि. वरेरकर | ना. सी. फडके | ४-८-१८९४ | २२-१०-१९७८ |
| २६. | १९४१ | सोलापूर | रतनचंद हिराचंद | वि. सा. खांडेकर | ११-१-१८९८ | २-९-१९७६ |
| २७. | १९४२ | नाशिक | वा. श्री. पुरोहित | प्र. के. अत्रे | १३-८-१८९८ | १३-६-१९५९ |
| २८. | १९४३ | सांगली | गो. गो. मुजुमदार | श्री. म. माटे | ३१-८-१८८६ | २५-१२-१९५७ |
| २९. | १९४४ | धुळे | शं. श्री. देव | भा. वि. वरेरकर | २७-४-१८८३ | २९-९-१९६४ |
| ३०. | १९४६ | बेळगाव | भुजंगराव दळवी | ग. त्र्यं. माडखोलकर | २८-१२-१८९९ | २७-११-१९७६ |
| ३१. | १९४७ | हैद्राबाद | श्री. वि. नाईक | न. र. फाटक | २५-४-१८९३ | २१-१२-१९७९ |
| ३२. | १९४९ | पुणे | द. वा. पोतदार | शं. द. जावडेकर | २६-९-१८९४ | १०-१२-१९५५ |
| ३३. | १९५० | मुंबई | भा. वा. वाड | य. दि. पेण्ढरकर | ९-३-१८९९ | २६-११-१९८५ |
| ३४. | १९५१ | कारवार | वामनराव वाघ | अ. का. प्रियोळकर | ५-९-१८९५ | १३-४-१९७३ |
| ३५. | १९५२ | अमळनेर | म. गो. भालेराव | कृ. पां. कुलकर्णी | ५-१-१८९३ | १२-६-१९६४ |
| ३६. | १९५३ | अहमदाबाद | ग. बा. मोहिले | वि. द. घाटे | १८-१-१८९५ | ३-५-१९७८ |
| ३७. | १९५४ | न्यू दिल्ली | न. वि. गाडगीळ | लक्ष्मणशास्त्री जोशी | २८-१-१९०१ | २७-५-१९९४ |
| ३८. | १९५५ | पंढरपूर | ग. वा. जोशी | शं. दा. पेंडसे | २८-२-१८९७ | २३-८-१९७४ |
| ३९. | १९५७ | औरंगाबाद | देवीसिंग चौहान | अनंत काणेकर | २-१२-१९०५ | ४-५-१९८० |
| ४०. | १९५८ | मालवण | वि. द. साळगावकर | आ. रा. देशपांडे (अनिल) | ११-९-१९०१ | ८-५-१९८२ |
| ४१. | १९५९ | मिरज | वि. स. खांडेकर | श्री. के. क्षीरसागर | ६-११-१९०१ | २९-४-१९८० |
| ४२. | १९६० | ठाणे | वा. प्र. ओक | रा. श्री. जोग | १५-५-१९०३ | २१-२-१९७७ |
| ४३. | १९६१ | ग्वाल्हेर | देवराव जाधव | कुसुमावती देशपांडे | १०-११-१९०४ | १७-११-१९६१ |
| ४४. | १९६२ | सातारा | ना. ह. देशपांडे | न. वि. गाडगीळ | १०-१-१८९६ | १२-१-१९६६ |
| ४५. | १९६४ | मडगाव (गोवा) | का. दा. नायक | वि. वा. शिरवाडकर | २७-२-१९१२ | १०-३-१९९९ |
| ४६. | १९६५ | हैद्राबाद | गो. अ. एकबोटे | वा. ल. कुलकर्णी | २७-१-१९११ | २५-१२-१९९१ |





अनुक्रमणिका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४७. | १९६७ | भोपाळ | वालमुकुंद शुक्ल | वि. भि. कोल्ते | २२-६-१९०८ | ८-४-१९९७ |
| ४८. | १९६९ | वर्धा | रामेश्वर वजाज | पु. शि. रेगे | २-८-१९१० | १७-२-१९७८ |
| ४९. | १९७३ | यवतमाळ | सुधाकर नाईक | ग. दि. माडगूळकर | १-१०-१९१९ | १४-१२-१९७७ |
| ५०. | १९७४ | इचलकरंजी | रणजित देसाई | पु. ल. देशपांडे | ८-११-१९१९ | १२-६-२००० |
| ५१. | १९७५ | कराड | यशवंतराव चव्हाण | दुर्गा भागवत | १०-२-१९१० | ७-५-२००२ |
| ५२. | १९७७ | पुणे | ग. ल. ठोकळ | पु. भा. भावे | १२-४-१९१० | १३-८-१९८० |
| ५३. | १९७९ | चंद्रपूर | शांताराम पोटदुखे | वामन चोरघडे | १६-७-१९१४ | ३०-११-१९९५ |
| ५४. | १९८० | वार्शी | सुशीलकुमार शिंदे | गं. बा. सरदार | २-१०-१९०८ | ११-१२-१९८८ |
| ५५. | फे. १९८१ | अकोला | मधुसूदन वैराळे | गो. नी. दांडेकर | ८-७-१९१७ | १-६-१९९८ |
| ५६. | डि. १९८१ | रायपूर | त्रिं. म. घाटे | गंगाधर गाडगीळ | २५-८-१९२३ | १५-९-२००८ |
| ५७. | फे. १९८३ | अंबेजोगाई | व्यंकटराव देशपांडे | व्यंकटेश माडगूळकर | ६-७-१९२७ | २८-८-२००१ |
| ५८. | जा. १९८४ | जळगाव | मधुकरराव चौधरी | शंकरराव खरात | ११-७-१९२१ | ९-४-२००१ |
| ५९. | १९८५ | नांदेड | श्यामराव कदम | शंकर पाटील | ८-८-१९२६ | ३०-७-१९९४ |
| ६०. | आ. १९८६ | मुंबई | दत्ताजीराव नलावडे | विश्राम बेडेकर | १३-८-१९०६ | ३०-१०-१९९८ |
| ६१. | जा. १९८८ | ठाणे | वसंतराव डावखरे | वसंत कानेटकर | २०-३-१९२२ | ३०-१-२००१ |
| ६२. | जा. १९८९ | अमरावती | रा. सू. गवई | ० के. ज. पुरोहित | १५-६-१९२३ | |
| ६३. | जा. १९९० | पुणे | अण्णा जोशी | ० यू. म. पठाण | ९-३-१९३० | |
| ६४. | डि. १९९० | रत्नागिरी | अ. कृ. शिंदे | ० मधु मंगेश कर्णिक | २८-४-१९३३ | |
| ६५. | १९९२ | कोल्हापूर | डी. वाय. पाटील | रमेश मंत्री | ६-१-१९२५ | १८-६-१९९८ |
| ६६. | फे. १९९३ | सातारा | अभयसिंगराजे भोसले | विद्याधर गोखले | ४-१-१९२४ | २६-९-१९९६ |
| ६७. | जा. १९९४ | पणजी | शशिकला काकोडकर | ० राम शेवाळकर | २-३-१९३१ | |
| ६८. | जा. १९९५ | परभणी | रावसाहेब जामकर | ० नारायण सुर्वे | १५-१०-१९२६ | |
| ६९. | फे. १९९६ | आळंदी | वि. दा. कराड | शांता ज. शेळके | २१-१०-१९२२ | ६--६-२००२ |
| ७०. | जा. १९९७ | अहमदनगर | यशवंतराव गडाख पाटील | ना. सं. इनामदार | २३-११-१९२३ | १५-१०-२००२ |
| ७१. | १९९८ | परळी वैजनाथ | गोपीनाथ मुंडे | ० द. मा. मिरासदार | १४-४-१९२७ | |
| ७२. | फे. १९९९ | मुंबई | मनोहर जोशी | वसंत बापट | २५-७-१९२२ | १७-९-२००२ |
| ७३. | ए. २००० | बेळगाव | नरसिंहराव पाटील | य. दि. फडके | ३-१-१९३१ | २००८ |
| ७४. | जा. २००१ | इंदूर | सुमित्रा महाजन | ० विजया राजाध्यक्ष | ५-८-१९३३ | |
| ७५. | जा. २००२ | पुणे | ज्ञानेश्वर आगाशे | ० राजेंद्र बनहट्टी | १४-१-१९३८ | |
| ७६. | जा. २००३ | कराड | श्रीनिवास कुलकर्णी | ० सुभाष भेंडे | १४-१०-१९३६ | |
| ७७. | २००४ | औरंगाबाद | मधुकरराव मुळे | ० रा. ग. जाधव | २४-८-१९३२ | |
| ७८. | २००५ | नाशिक | वसंतराव पवार | केशव मेश्राम | २४-११-१९३७ | |
| ७९. | २००६ | सोलापूर | लक्ष्मणराव ढोवळे | ० मारुती चितमपल्ली | ५-११-१९३२ | |
| ८०. | फे. २००७ | नागपूर | गिरिश गांधी | ० अरुण साधू | १९४० | |
| ८१. | २००८ | सांगली | उत्तम कांबळे | ० म. द. हातकणंगलेकर | १-२-१९२७ | |
| ८२. | २००९ | महाबळेश्वर | -- | ० डॉ. आनंद रतन यादव | ३०-११-१९३५ | |

* पहिली ६ संमेलने ग्रंथकार संमेलने या नावाने भरली.

* पुढे महाराष्ट्र सा. संमेलन, मराठी, सा. संमेलन आणि १९६५ पासून 'अ. भा. मराठी साहित्य संमेलन' या नावाने मराठी सा. महामंडळाचे वतीने भरू लागली.

० चौदा अध्यक्ष हयात.

० पहिल्या पाच संमेलनापर्यंत स्वागताध्यक्ष नाहीत.

० अध्यक्षांमध्ये (८१) चार स्त्रीअध्यक्ष.

० पहिल्या सात अध्यक्षांची छापील भाषणे नाहीत.

० वा. गो. आपटे (१९०८) पहिले स्वागताध्यक्ष.

० वयपरत्वे न्या. रानडे सर्वांत पहिले अध्यक्ष-वय ३७.

० वयपरत्वे विश्राम बेडेकर सर्वांत वयस्कर अध्यक्ष वय ८०

० आनंदीबाई शिर्के पहिल्या स्वागताध्यक्ष १९३६ तर शशीकला काकोडकर दुसऱ्या (पणजी १९९४)

० भाषणच न केलेले अध्यक्ष श्रीमंत सयाजीराव गायकवाड

० वि. मो. महाजनी, चिं. वि. वैद्य, न. चिं. केळकर, द. वा. पोतदार, वि. स. खांडेकर आणि भा. वि. वरेरकर या सहा व्यक्तींना अध्यक्ष आणि स्वागताध्यक्ष होण्याचे भाग्य लाभले.

० १९३८ चे मुंबई संमेलन बॅ. जयकर आणि बॅ. सावरकर अशा दोन बॅरिस्टरांचे म्हणून ओळखले जाते.

० सर्वाधिक संमेलने भरविण्याचा मान (१० वेळा) पुण्याला.

० न्यू दिल्ली येथील संमेलनाचे उद्‌घाटन (१९५४) भारताचे पंतप्रधान पं. नेहरू यांच्या हस्ते भर पावसात झाले.

० ग्रंथदिंडीचा उपक्रम १९५५ पासून (पंढरपूर) सुरू झाला.

० आ. रा. देशपांडे (अनिल) आणि कुसुमावती देशपांडे या दोघा पतिपत्नींना अध्यक्षपदाचे भाग्य लाभले.

० उधळले गेलेले (१९७७ पुणे) एकमेव संमेलन पुण्याचे.

१९०६ च्या चौथ्या संमेलनात महाराष्ट्र साहित्य परिषद स्थापन झाल्याची घोषणा न. चिं. केळकर यांनी केली.

कालपट व इतर माहिती
म. श्री. दीक्षित, पुणे यांचेकडून

# कार्यवृत्त

## (१ डिसेंबर २००८ ते २८ फेब्रुवारी २००९)

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह

**दि. १५ डिसेंबर २००८ :**

**माधवजुलियन स्मृतिदिन : निमंत्रितांचे कविसंमेलन :**

गझलकार कवी दीपक करंदीकर यांच्या अध्यक्षतेखाली व कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या उपस्थितीत निमंत्रित कवींचे कविसंमेलन झाले. डॉ. संगीता बर्वे, मनोहर सोनवणे, अस्मिता जोगदंड, आश्लेषा महाजन, घनश्याम धेंडे, चंद्रकांत वानखेडे, महादेव कोरे, चित्तरंजन भट, या कवींनी आपल्या रचना सादर केल्या. माधव जूलियन यांचे चरित्र व त्यांचे कार्य दीपक करंदीकर यांनी थोडक्यात उपस्थितांना सांगितले. स्थानिक कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी स्वागत केले व सूत्र संचालन मृणालिनी कानिटकर यांनी केले.

**दि. २१ डिसेंबर २००८ : नाट्यविभाग :**

अ. भा. मराठी नाट्य परिषद, पुणे शाखा व म. सा. परिषद, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने ८९ व्या अ. भा. नाट्यसंमेलनाचे नवनिर्वाचित अध्यक्ष श्री. रामदास कामत यांचा सत्कार प्रमुख पाहुणे ज्येष्ठ रंगकर्मी चित्तरंजन कोल्हटकर यांच्या हस्ते झाला. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. यावेळी मराठी नाट्य परिषद, पुणे शाखेचे अध्यक्ष डॉ. सतीश देसाई व्यासपीठावर उपस्थित होते. नाट्यपरिषदेचे शशिकांत कुलकर्णी यांनी सूत्र संचालन केले. या प्रसंगी-भरत नाट्य मंदिरचे विजय वांकर, मराठी रंगभूमीचे निनाद जाधव, रंगभूमी सेवकसंघाचे सुरेंद्र गोखले, ज्येष्ठ नाट्य कलावंत निर्मलाताई गोगटे या संस्था व व्यक्तींनी रामदास कामत यांचा सत्कार केला. त्यानंतर कामतांनी आपले मनोगत व्यक्त केले. सुरेशचंद्र पाध्ये, मनोहर कुलकर्णी, राघवेंद्र कडकोळ, म. श्री. दीक्षित इत्यादी नाट्य, साहित्य, वृत्तपत्र क्षेत्रातील अनेक मान्यवर उपस्थित होते. नाट्यपरिपदेचे कार्यवाह सुरेश देशमुख यांनी आभार मानले. त्यानंतर डॉ. माधवी वैद्य व रवींद्र खरे यांनी रामदास कामत यांची मुलाखत घेतली.

**दि. २४ डिसेंबर २००८ :**

महाराष्ट्र साहित्य पत्रिका या परिषदेच्या त्रैमासिकाच्या कथाविशेषांकाचे प्रकाशन व कै. गंगाधर गाडगीळ कथास्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ : या समारंभाच्या अध्यक्षस्थानी डॉ. आनंद यादव व प्रमुख पाहुणे म्हणून शंकर सारडा होते. शंकर सारडा यांच्या हस्ते पत्रिकेचा ३२६ अंक प्रकाशित करण्यात आला. कथा स्पर्धेचे परीक्षक म्हणून सारडा यांनी मनोगत व्यक्त केले. त्यानंतर डॉ. आनंद यादव यांनी अध्यक्षीय समारोप केला. संदीप माळी, कविता साबळे, मयुरी- तसेच प्रौढगटात विनायक फाटक, माधवी तळवलकर, जयंत वेंद्रे, पु. ए. रामदासी, सौ. कल्पना धर्माधिकारी, अनघा केसकर, भारती पांडे या यशस्वी स्पर्धकांना पारितोषिके दिली गेली.

**दि. २८ डिसेंबर २००८ : युवा मुक्त मंच :**

राज्य स्तरीय कथाकथन स्पर्धा बक्षीस वितरण समारंभः ज्येष्ठ लेखक व परिषदेचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या अध्यक्षतेखाली, त्यांच्या हस्ते यशस्वी कथाकथन करणाऱ्या स्पर्धकांना बक्षिसे वाटण्यात आली. स्पर्धा खुला गट व महाविद्यालयीन गटात झाली. खुला गटः प्रथम क्रमांक : रामचंद्र पवार, द्वितीय क्रमांक : अवधूत पटवर्धन, तृतीय क्रमांक : संज्ञा कुलकर्णी व उत्तेजनार्थ : रेश्मा मरकळे व अजित कुंटे. महाविद्यालयीन गट : प्रथम क्रमांक : तेजस्विनी बापट, द्वितीय क्रमांक : विठ्ठल काळे, तृतीय क्रमांक : संजय ऐलवाड व उत्तेजनार्थः नितीन चंदनशिवे व कविता साबळे अशी यशस्वी स्पर्धकांची नावे आहेत.

या स्पर्धांसाठी परीक्षक म्हणून मधू नेने, भारती पांडे, डॉ. पुरुषोत्तम काळे, प्रा. रुपाली शिंदे यांनी काम पाहिले.

**दि. २९ डिसेंबर २००८ :**

मराठी शायर भाऊसाहेब पाटणकर जन्मशताब्दी निमित्त अनिल पारगावकर यांचा 'शेरोशायरी भाऊसाहेब पाटणकरांची' हा बहारदार एकपात्री कार्यक्रम सादर झाला.

**दि. ३० डिसेंबर २००८ : कविवर्य गंगाधर महाम्बरे श्रद्धांजली सभा :**

परिषदेचे उपाध्यक्ष डॉ. वि. मा. बाचल हे

अध्यक्षस्थानी होते. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. याप्रसंगी पुढील वक्त्यांनी श्रद्धांजलीपर भाषणे केली- प्रतिभा मोडक, बाळ ज. पंडित, सुरेश रानडे, प्रमोद आडकर, रशीद खान, राजकुमार लोढा, राजेंद्र बांदिवडेकर, मंगेश वाघमारे, मंगेश कश्यप, मंदा नाईक, डॉ. सतीश देसाई, उषा बढे, सु. वा. जोशी, अरुण जाखडे, मिलिंद जोशी, मधुसूदन घाणेकर, जयंत भिडे, फैय्याज हुसेन खान, राजेंद्र खेर, राजीव बर्वे, प्रा. डॉ. अरविंद कुलकर्णी, कृष्णकांत जाधव, हर्षित अभिराज. गायिका धनश्री गणात्रा यांनी महाम्बरे यांचे 'तूच खरा आधार' हे चित्रपट गीत सादर केले. डॉ. माधवी वैद्य यांनी शोकप्रस्तावाचे वाचन केले.

**दि. १ जानेवारी २००९ : परीक्षा विभाग : मराठी मार्गदर्शन शिबिर :**

शिक्षणतज्ज्ञ डॉ. न. म. जोशी हे अध्यक्षस्थानी होते. डॉ. वैखरी वैद्य, अर्वाचीन मराठी गद्य-पद्य, प्रा. रुपाली शिंदे भाऊभाऊ-काव्य गंगा, प्रा. डॉ. उज्ज्वला गोखले-व्यावहारिक व उपयोजित मराठीतील बातमी लेखन व संवाद लेखन तसेच डॉ. मधुरा कोरान्ने व डॉ. कल्याणी दिवेकर- 'उपयोजित मराठी' या विषयांवर उपस्थितांना मार्गदर्शन केले. अध्यक्षीय समारोप- डॉ. न. म. जोशी यांनी केला. या शिबिरास प्रतिसाद चांगला मिळाला होता.

**दि. ११ जानेवारी २००९ :**

कै. वि. स. खांडेकर स्मृतिदिन - वि. स. खांडेकर व्यक्ती आणि वाङ्मय या विषयावर ज्येष्ठ पत्रकार संपादक अनंत दीक्षित यांचे व्याख्यान झाले.

**का. र. मित्र व्याख्यानमाला : दि. १९, २०, २१ व २२ जानेवारी २००९ :**

असे चार दिवस दरवर्षीप्रमाणे का. र. मित्र व्याख्यानमाला झाली. **पहिले पुष्प** ज्येष्ठ पत्रकार संपादक विजय कुवळेकर यांचे ना. घ. देशपांडे जन्मशताब्दीनिमित्त 'दूरस्थ ना. घ. देशपांडे' या विषयांवर व्याख्यान झाले. **दुसरे पुष्प** डॉ. अरुणा ढेरे यांचे बा. भ. बोरकर जन्मशताब्दीनिमित्त 'पोएट बोरकर' या विषयावर व्याख्यान झाले. **तिसरे पुष्प** डॉ. नीलिमा गुंडी यांचे 'इंदिरा संत यांची कविता' या विषयावर व्याख्यान झाले तर चवथे पुष्प ज्येष्ठ समीक्षक डॉ. द. भि. कुलकर्णी यांनी 'मर्ढेकरांची अनन्यता' या विषयावर व्याख्यान देऊन गुंफले. या व्याख्यानमालेस श्रोत्यांचा भरघोस प्रतिसाद मिळाला.

**दि. २१ जानेवारी २००९ :**

८२व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष डॉ. आनंद यादव यांचा पहिला जाहीर सत्कार परंपरेप्रमाणे म. सा. परिषदेतर्फे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते करण्यात आला. विविध संस्था व व्यक्तींतर्फे डॉ. यादव यांचा सत्कार करण्यात आला, त्यात मराठी प्रकाशक परिषदेतर्फे अरुण जाखडे, मराठी विज्ञान परिषदेचे म. ना. गोगटे साहित्य प्रेमी भगिनी मंडळातर्फे ज्योत्स्ना आफळे, रंगतसंगत प्रतिष्ठान व आडकर फौंडेशनतर्फे सौ. आडकर तसेच काव्यविभागातर्फे स्वाती सामक, काव्यशिल्प, पुणेचे र. ह. कुलकर्णी व सु. वि. पारखी, तसेच मीरा अरुण शिंदे, रेश्मा सुलाखे, श्याम भुर्के, डॉ. तानाजी पाटील, धर्मराज़ निमसरकर, जयंत भोसले हे होते. सौ. कीर्ती मुळीक या सरांच्या कन्या यांचाही सत्कार करण्यात आला.

'भारत देश हा कृषिप्रधान देश आहे. ग्रामीण जीवन हे त्याचे खरे वास्तव आहे. कारण तेच संपूर्ण देशाला अन्न पुरविते. उपेक्षित ग्रामीण वास्तव जसे आहे त्या भाषेत प्रकट करणे म्हणजे कोणतेही वेगळेपण नाही. एका उपेक्षित समाजाला की ज्यातून आपण आलो त्याला प्रकट करणे यासाठी मी लिहिले' असे विचार त्यांनी व्यक्त केले.

**दि. २८ जानेवारी २००९ :**

**नवं कोरे :**

या उपक्रमांतर्गत डॉ. मधुरा कोरान्ने यांच्या 'एकपात्री प्रयोग-स्वरूप आणि कलारूप' या पुस्तकाचे स्वागत करण्यात आले. प्रमुख पाहुण्या म्हणून प्रसिद्ध नाट्य अभिनेत्री लालन सारंग व मकरंद टिल्लू उपस्थित होते. तसेच प्रमुख वक्ते म्हणून कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी व कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे व्यासपीठावर होते.

**दि. १ फेब्रुवारी २००९ :**

**'कविता सिंगापूर वासियांच्या' :**

चि. वेदान्त, सौ. अपर्णा व श्री. अतुल घाटे, सौ. सुनिता व श्री. अनिल केळकर या सिंगापूर येथील कवींचा काव्यवाचनाचा कार्यक्रम झाला.

**दि. २ फेब्रुवारी २००९ :**
**दिवाळी अंक-२००८ स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ :**

ज्येष्ठ संपादिका डॉ. विद्या बाळ या प्रमुख पाहुण्या होत्या. 'स्त्री साहित्यातील वास्तव' या विषयावर त्यांनी व्याख्यान दिले. त्यांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली. परीक्षक म्हणून अंजली कुलकर्णी व मृणालिनी जोशी यांनी काम पाहिले. सौ. जोशी यांनी परीक्षकाचे मनोगत व्यक्त केले. पारितोषिक विजेत्यांपैकी वीणा आलासे, डॉ. विश्वास मेहेंदळे, डॉ. मंदा खांडगे, भानू काळे यांनी आपले मनोगत व्यक्त केले.

दिवाळी अंक २००८ स्पर्धा निकाल पुढे दिला आहे.

परिषदेच्या नाट्यविभागातर्फे १ व २ फेब्रुवारी २००९ । असे दोन दिवस नाट्यवाचन स्पर्धा घेण्यात आली. बालगट, मोठा गट व खुला गट अशा तीन गटात सुमारे १३ गटांनी सहभाग घेतला. परीक्षक म्हणून श्रीराम

## दिवाळी अंक स्पर्धा २००८
## (निर्णय)

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या या वर्षीच्या, दिवाळी अंक २००८ च्या स्पर्धेसाठी ६७ अंक आले. या स्पर्धेचा निकाल सर्व परीक्षकांनी एकमताने दिला आहे.

१) अ. स. गोखले स्मृत्यर्थ 'रत्नाकर' पारितोषिक — रुपये १००१/-
अंक : अंतर्नाद — संपादक : भानू काळे

**श्री. चंद्रकांत शेवाळे (संपादक-ग्रहांकित) पुरस्कृत तीन पारितोषिके**

२) विविध ज्ञानविस्तारकर्ते 'रावसाहेब मोरमकर' पारितोषिक — रुपये १०००/-
अंक : साहित्यप्रेमी — संपादक : मंदा खांडगे

३) मासिक मनोरंजनकार 'का. र. मित्र' पारितोषिक — रुपये १०००/-
अंक : मनोविकास इत्यादी — संपादक : आशिश पाटकर

४) शं. वा. किर्लोस्कर यांच्या स्मरणार्थ पारितोषिक (विभागून) — रुपये १०००/-
१) अंक : आशय — संपादक : नितीन वैद्य/जयंत राळेरासकर
२) अंक : अथश्री — संपादक : डॉ. विश्वास मेहेंदळे

५) उत्कृष्ट कथेचे 'दि. अ. सोनटक्के' पारितोषिक — रुपये ५००/-
कथा : 'एम्वॉलिझम' — लेखक : समीर कुलकर्णी
अंक : अनुभव — संपादक : युनिक फीचर्स

६) उत्कृष्ट ललितलेखासाठी 'अनंत काणेकर' पारितोषिक (विभागून) — रुपये २००/-
१) लेख : 'दशपदीचे इतिवृत्त' — लेखिका : वीणा आलासे
अंक : लोकमत — संपादक : विजय दर्डा
२) लेख : 'साहित्यातील दोन शिवाजी' — लेखक : प्रा. मिलिंद जोशी
अंक : अंतर्नाद — संपादक : भानू काळे

७) वाल विभागासाठी विशेष पारितोषिक — रुपये ५००/-
(कै. जानकीवाई केळकर यांच्या स्मरणार्थ)
अंक : निर्मळ रानवारा — संपादक : ज्योती जोशी



अनुक्रमणिका

रानडे, दीपक रेगे व नंदा सुर्वे यांनी काम पाहिले.

**दि. ८ फेब्रुवारी २००९ :** परिषदेच्या नाट्यविभागातर्फे घेण्यात आलेल्या नाट्यवाचन व एकांकिका लेखन स्पर्धांचे पारितोषिक वितरण योगेश सोमण यांच्या हस्ते झाले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे व श्रीराम रानडे यांनी आपले मनोगत व्यक्त केले. सदरहू एकांकिका लेखन स्पर्धा व नाट्यवाचन स्पर्धेचा निकाल पुढे सविस्तर दिला आहे.

## एकांकिका लेखन स्पर्धा-२००९ (स्पर्धेचा निर्णय)

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पारितोषिक | रु. ७५०/- | 'पॅकेज' | सचिन काळे |
| द्वितीय पारितोषिक | रु. ५००/- | 'असंही असू शकेल' | चंद्रशेखर आफळे |
| तृतीय पारितोषिक | रु. २५०/- | 'आता तरी शहाणे व्हा' | अरविंद कुलकर्णी |
| उत्तेजनार्थ पारितोषिक | रु. १००/- | १) 'बारा ते सव्वा बारा' | हृषिकेश पेटवे |
| | रु. १००/- | २) 'घरावाहेर' | मालती आठवले |
| | रु. १००/- | ३) 'उद्ध्वस्त' | मदन बंब |

## नाट्यवाचन स्पर्धा-२००९ (स्पर्धेचा निर्णय)

### नाट्यवाचन स्पर्धा (सांघिक)

| | | |
|---|---|---|
| प्रथम पारितोषिक | रु. ५००/- | 'जावडेकर बोला' |
| द्वितीय पारितोषिक | रु. ३००/- | 'उद्ध्वस्त धर्मशाळा' |
| तृतीय पारितोषिक | रु. २००/- | 'चारचौघी' |
| उत्तेजनार्थ पारितोषिक | रु. १००/- | 'एक नवरा झेलूबाई' |

### वैयक्तिक - पुरुष कलाकार

| | | | |
|---|---|---|---|
| १) जय कुलकर्णी | रु. ३००/- | (लेखक/निवेदक) | 'जावडेकर बोला' |
| २) पद्नाभ बिंड | रु. २००/- | (श्रीधर विश्वनाथ) | 'उद्ध्वस्त धर्मशाळा' |

### वैयक्तिक - स्त्री कलाकार

| | | | |
|---|---|---|---|
| १) अरुंधती राहणे | रु. ३००/- | (माधवी) | 'जावडेकर बोला' |
| २) मीनल बाठे | रु. २००/- | (विद्या) | 'चारचौघी' |

**२३ फेब्रुवारी २००९ : रा श्री. जोग पुरस्कार वितरण समारंभ :**

डॉ. मिलिंद मालशे आणि डॉ. अशोक जोशी यांनी लिहिलेल्या 'आधुनिक समीक्षा सिद्धांत' ह्या पुस्तकास ज्येष्ठ समीक्षक डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्या हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आला. या पुस्तकाचे प्रकाशक, मौज प्रकाशन मुंबई यांनाही पुरस्कार दिला तेव्हा परिषदेचे कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांनी प्रास्ताविक केले. स्वाती महाळंक यांनी सूत्रसंचालन केले.

**२७ फेब्रुवारी २००९ : युवामंच :**

'जागतिक मराठी भाषा दिन' आणि कविवर्य कुसुमाग्रज जन्मदिनीच्या निमित्ताने राज्यस्तरीय वादविवाद स्पर्धा आयोजित करण्यात आली होती. या स्पर्धेसाठी 'मराठी भाषेच्या संवर्धनासाठी मराठी माणूस प्रयत्नशील आहे काय?' हा विषय स्पर्धकांसाठी देण्यात आला होता. परीक्षक म्हणून स्वाती महाळंक व नचिकेत जोशी यांनी काम पाहिले. स्पर्धेचा बक्षीस वितरण समारंभ लगेचच सायंकाळी डॉ. कल्याणी दिवेकर यांच्या हस्ते झाला. यावेळी परिषदेच्या प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य उपस्थित होत्या. संदीप वर्वे यांनी प्रास्ताविक व स्वागत केले. सूत्रसंचालन महेंद्र मुंजाळ यांनी केले. स्पर्धेच्या पारितोपिक प्राप्त विजेत्यांची नावे खालीलप्रमाणे :-

प्रथम क्रमांक (विभागून) : हर्षल चव्हाण व हरेश शेळके

द्वितीय क्रमांक : दयानंद जाधव

उत्तेजनार्थ : अनिमेश डोंगरे, मंदार कारंजकर, प्रणिता कुलकर्णी.

**२७ फेब्रुवारी २००९ : कॉन्टिनेन्टल पुरस्कृत 'कवी कुसुमाग्रज पुरस्कार वितरण समारंभ :**

ज्येष्ठ कवी सुधीर मोघे यांच्या हस्ते कवी विलास वरे यांच्या 'शेतकळा' ह्या काव्यसंग्रहास व डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांच्या नीहारा प्रकाशनास प्रकाशकाचा कवी कुसुमाग्रज पुरस्कार (कॉन्टिनेन्टल पुरस्कृत) प्रदान करण्यात आला. परीक्षक सौ. अंजली कुलकर्णी व प्रदीप निफाडकर होते. परिषदेचे कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे व प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य व्यासपीठावर उपस्थित होते. स्वाती महाळंक यांनी सूत्रसंचालन, दीपक करंदीकर यांनी पुरस्कार विजेते कवी श्री. वरे यांचा परिचय करून दिला व ह. ल. निपुणगे यांनी आभार मानले.

**२८ फेब्रुवारी २००९ : जागतिक विज्ञानदिन :**

म. सा. प. व मराठी विज्ञान परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने डॉ. सुलभा कुलकर्णी यांचे 'नॅनो तंत्रज्ञान आणि निसर्ग' या विषयावर व्याख्यान झाले. यावेळी व्यासपीठावर म. ना. गोगटे, डॉ. वि. भा. देशपांडे व डॉ. माधवी वैद्य हे होते.

वरील तिमाहीत झालेल्या कार्यक्रमामध्ये प्रास्ताविक, परिचय, स्वागत, आभार, सूत्रसंचालन इत्यादी कामे परिषदेच्या डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. माधवी वैद्य, ह. ल. निपुणगे, प्रा. डॉ. सु. प्र. कुलकर्णी, श्री. अनंत जोशी, प्रा. मिलिंद जोशी, स्वाती महाळंक, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, नंदा सुर्वे, डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. पुरुषोत्तम काळे, मधू नेने, दीपक करंदीकर, महेंद्र मुंजाळ, रामचंद्र शिंदे, ह्या कार्यकर्त्यांनी वेळोवेळी केली.

**कॉफी क्लब :**

**दि. १० डिसेंबर २००८ :** रोजी ज्येष्ठ रंगकर्मी, चित्रपट कथालेखक श्री. श्रीनिवास भणगे यांच्याशी गप्पा झाल्या. त्यांच्या पत्नी सौ. वर्षा भणगे उपस्थित होत्या.

**दि. २४ डिसेंबर २००८ :** रोजी एकपात्री कलावंत बंडा जोशी यांच्याशी गप्पांचा कार्यक्रम झाला.

**दि. ७ जानेवारी २००९ :** उत्कर्ष प्रकाशनचे प्रसिद्ध प्रकाशक व पुस्तक विक्रेते श्री. सु. वा.जोशी यांच्याशी गप्पा झाल्या.

**दि. ११ फेब्रुवारी २००९ :** लेखक सु. वि. पारखी यांच्याशी गप्पा झाल्या.

**दि. २५ फेब्रुवारी २००९ :** प्रकाशिका सौ. शशिकला उपाध्ये यांच्याशी गप्पांचा कार्यक्रम झाला. परिषदेचे कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे उपस्थित होते.

❖❖❖

## सोलापूर शाखा

**दि. ११/१०/२००८ :** म.सा.प. तुमच्यादारी या उपक्रमांतर्गत प्रा. अर्जुन व्हटकर व नाट्य कलावंत सौ. अपर्णा रामतीर्थकर यांच्या कथाकथनाचा कार्यक्रम झाला.

**दि. १२/१०/२००८ :** कै. त्र्यं. वि. सरदेशमुख यांच्या तृतीय स्मृतिदिनानिमित्त शाखा व सुविद्या प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने 'देवदूताचे विहारवन आणि अग्रदूत' सरदेशमुखांनी लिहिलेल्या पुस्तकाचे प्रकाशन पत्रकार अरुण खोरे यांच्या हस्ते झाले. प्रा. निशिकांत ठकार अध्यक्षस्थानी होते. दत्ता हलसगीकर, हेमकिरण पत्की हे उपस्थित होते.

**दि. १७/१८/१९ डिसेंबर २००८ : चंडक व्याख्यानमाला :** या व्याख्यानमालेत डॉ. द. ता. भोसले पंढरपूर यांचे 'लोकोत्तर गाडगेबुवा' या विषयावर तर डॉ. सौ. ऋचा कांबळे, सोलापूर यांचे 'मराठी साहित्यातील स्त्री दर्शन' या विषयावर तर डॉ. आनंद यादव यांचे 'संतसूर्य तुकाराम' या विषयावर व्याख्याने झाली. डॉ. सुहास पुजारी, मारुती कटकधोंड, बाबुराव मैंदगीकर, शोभना सागर, प्रा. प्रेमचंद मेने, रजनीश जोशी, ॲड. जे. जे. कुलकर्णी, अरुण धुमाळ, अरविंद जोशी, श्रुती वडगबाळकर, निर्मला मठपती, राजेंद्र भोसले या कार्यकर्त्यांनी आभार, सूत्रसंचालन, परिचय, प्रास्ताविक इ. कामे केली.

या व्याख्यानमालेच्या शेवटच्या दिवशी, चंडक ट्रस्ट तर्फे सोलापूर भूषण आदर्श विद्यार्थी व विद्यार्थिनींचा सत्कार करण्यात आला.

- कार्यवाह, सोलापूर शाखा

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह

शब्दांकन - दीपक करंदीकर स्वीकृत सदस्य, म.सा.प, पुणे

❖❖❖

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : January to March 2009
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57



प्रेषक

बुक-पोस्ट




प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे-४११०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.






